# नवभारत

वर्ष ६ वें ] डिसेंबर १९५२ [ अंक ३ रा

५८८८

सर्वोदयाच्या साधनेची गुप्त सरस्वती . श्री. शंकरराव देव
अमेरिकेचे नवीन अध्यक्ष व जागतिक राजकारण प्रा. नारायण देशपांडे
वैदिक संस्कृतींतील धर्मकल्पनांचा विकास . प्रा. गो. स. घुर्ये
दक्षिण-भारत-संस्कृतीचें दर्शन . श्री. श्री. रा. टिकेकर
ॲरिस्टाटलविरुद्ध मोहीम . . प्रा. दि. द. माहुलकर
पुन्हां एकदा 'एकच प्याला' . . प्रा. राजा पाटणकर
धर्माज्ञांचें मूल्यमापन . . . पं. रघुनाथशास्त्री कोकजे

क विता, सा र सं क ल न

किंमत १ रुपया







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

नव्या भारताचा नवा इतिहास घडविणारी

# दैवी संपत् 'चरित्र-माला

संपादक : श्री. दा. न. शिखरे, श्री. आपटे गुरुजी

## दोन पुष्पें प्रसिद्ध झालीं

अभय, सत्य, दया, क्षमा, शांति, तेज इत्यादि दैवी संपत्तीच्या सर्व राष्ट्रांतील व सर्व काळांतील विभूतींच्या चरित्रांतील उज्ज्वल कथा-भाग या मालेतर्फे प्रकाशित होत आहे. स्वतंत्र भारतांतील नवी पिढी चारित्र्यसंपन्न व सेवाशील बनण्यास ह्या मालेचें वाचन उपयुक्त ठरेल.

प्रथम पुष्पावरील अभिप्राय :

★ " नामांकित आणि सिद्धहस्त चरित्र-लेखकांचें साहाय्य मालेनें संपादन केलें आहे....जे प्रसंग चित्रित केले आहेत, ते अत्यंत रसाळ, चित्तवेधक व सौष्ठवपूर्ण शैलीनें रेखाटण्यांत आले असून मनाची तावडतोब पकड घेणारे आहेत. अशा प्रकारचें संस्कारक्षम वाङ्मय प्रस्तुत मालेतर्फे प्रसिद्ध होऊन तरुण पिढीच्या हातांत तें पडणार ही आनंदाची गोष्ट होय. " ★

—दैनिक तरुण भारत ( नागपूर )

साधना, लोकमान्य, लोकशक्ति, मन्वंतर, आनन्द, चित्रमय जगत् इत्यादि नियतकालिकांचे असेच गौरवपर अभिप्राय आले आहेत.



## दुसरें पुष्प

१. अब्राहाम लिंकन– ( लेखक : दे. ना. टिळक ); २. येशू ख्रिस्त, ३. लॉर्ड शॅफ्टस्बरी– ( लेखक : आपटे गुरुजी ); ४. डॉ. मुंथे– ( लेखक : स. शं. देसाई ); ५. महावीर– ( लेखक : र. मा. शहा ); ६. मांडव्य ऋषि– ( लेखक : पुराणप्रिय ); ७. ईश्वरचन्द्र विद्यासागर, ८. रविशंकर महाराज, ९. नागानंद, १०. म. गांधी– ( लेखक : दा. न. शिखरे ); ११. पांखरांचें स्वातंत्र्य– ( लेखक : स. शं. देसाई ).

**प्रत्येक पुस्तक सुमारें १०० पृष्ठांचें असून त्याची किंमत फक्त १ रु. आहे.**

- प्रत्येक पालकानें आपल्या मुलाचे हातीं द्यावें.
- प्रत्येक चालकानें आपल्या शाळेंत लावावें.

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २**

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें | अंक तिसरा

डिसेंबर १९५२

# नवभारत

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक

| | | |
|---|---|---|
| वैदिक संस्कृतींतील धर्मकल्पनांचा विकास | प्रा. गो. स. घुर्ये | १–१३ |
| ॲरिस्टाटल्‌विरुद्ध मोहीम | प्रा. दिनेश द. माहुलकर | १४–१७ |
| पुन्हां एकदां 'एकच प्याला' | प्रा. राजा पाटणकर | १८–२३ |
| धर्माज्ञांचें मूल्यमापन | पं. रघुनाथशास्त्री कोकजे | २४–३१ |
| दक्षिण-भारत-संस्कृतीचें ओझरतें दर्शन | श्री. श्री. रा. टिकेकर | ३२–३७ |
| अविचाराला 'नो व्हेकन्सी'! | श्री. राम शेवाळकर | ३७ |
| सर्वोदयाच्या साधनेची गुप्त सरस्वती | श्री. शंकरराव देव | ३८–४८ |
| अमेरिकेचे नवीन अध्यक्ष व जागतिक राजकारण | प्रा. ना. र. देशपांडे | ४९–५५ |
| सा र सं क ल न | | ५६–६४ |

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून
सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# 'नवभारत', डिसेंबर १९५२

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचे लेख या वर्षी मागील अंकांत आले असून, तेथें त्यांचा परिचय दिला आहे —का. सं. ]

प्रा. गो. स. घुर्ये पीएच्. डी. ( कॅन्टब. )—मुंबई विद्यापीठांत समाजशास्त्राचे प्राध्यापक व समाजशास्त्रविभागाचे प्रमुख. ' Occidental Civilization ', ' Caste and Class in India ', ' समाजशास्त्र ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. दिनेश द. माहुलकर—बडोदें येथील ' महाराज सयाजीराव ' विद्यापीठांत इंग्रजीचे प्राध्यापक. आधुनिक मानसशास्त्र व तत्त्वज्ञान यांचे व्यासंगी. ' नवे पैलू ' ( गीतेची समीक्षा ) या पुस्तकाचे लेखक.

प्रा. राजा पाटणकर—अहमदाबाद येथील गुजरात कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

पं. रघुनाथशास्त्री कोकजे तर्क सांख्य-तीर्थ—अध्यापक योगमहाविद्यालय, लोणावळा. ' धर्मनिर्णय-मंडळा 'चे प्रस्थापक आणि कार्यवाह. ' धर्मस्वरूप निर्णय ', ' भारतीय तर्कशास्त्रप्रवेश ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. श्री. रा. टिकेकर—' मुसलमानी मुलुखांतील मुशाफरी ', ' सिंहाला शह ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. राम शेवाळकर बी. ए.—अचलपूर ( म. प्र. ) येथील ' प्रकाशकलामंदिर ' या साहित्योपासक संस्थेचे संचालक.

प्रा. नारायण र. देशपांडे एम्. ए. एल्‌एल्. बी. पीएच्. डी. ( कोलंबिया )—पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक व राज्यशास्त्रविभागाचे प्रमुख.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.
* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.
* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

प्रा. गोविंद सदाशिव घुर्ये

# वैदिक संस्कृतींतील धर्मकल्पनांचा विकास

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी 'इचलकरंजीकर–स्मारक–व्याख्यानमालें'त १९४९ सालीं, 'आजची भारतीय संस्कृति वैदिक संस्कृतीचेंच विकसित रूप आहे' हा सिद्धान्त स्पष्ट करणारीं सहा व्याख्यानें दिलीं होतीं. तीं १९५१ च्या अखेरीस 'वैदिक संस्कृतीचा विकास'[1] या नांवाच्या पुस्तकरूपानें त्यांनीं प्रसिद्ध केलीं. या ग्रंथानें एतद्‌-विषयक मराठी वाङ्मयांत एक मौलिक भर घातली आहे. ग्रंथाची अपूर्वता लक्षांत घेऊन त्यांतील एक-दोन मुख्य मुद्द्यांचें या लेखांत परीक्षण करण्याचें योजिलें आहे.

तर्कतीर्थांनीं संस्कृतीची सर्वसाधारण ग्राह्य असलेली व्याख्या देऊन संस्कृतीचा मुख्य भाग आध्यात्मिक होय व त्यांतहि विद्या व कला हा संस्कृतीचा गाभा होय असें सांगितलें आहे. ते पुढें सांगतात कीं, धर्मकल्पना हें विद्येचेंच एक अंग आहे. नीति, कायदा, व सद्‌गुण आणि शिष्टाचार हीं त्यांत दिसून येतात व समाजसंस्था, राज्यतंत्र आणि कुटुंबव्यवस्था यांमध्यें तीं मूर्त स्वरूप धारण करतात. या सर्वांचा विकास हाच संस्कृतीचा विकास होय. संस्कृतीकडे पाहण्याची दृष्टि ही वर्गकलहमूलक न ठेवतां मूल्यमापक राखावी हें संस्कृतीच्या इतिहासावरून सिद्ध होतें. ज्याला संस्कृतीचा अंतरात्मा म्हणावयाला हरकत नाहीं असें अशा मूल्यांतील श्रेष्ठ मूल्य म्हणजे व्यक्तित्वाचा विकास हें होय. या दृष्टीनें मानवी संस्कृतीच्या इतिहासाचें आलोडन करतां असें आढळून येतें कीं, जरी प्रत्येक राष्ट्रीय संस्कृति ही एका अर्थी विश्वसंस्कृतीच्या बीजांतून निघून तिचा एक विशिष्ट आविष्कार म्हणून दिसून येत असली, तरी विश्वसंस्कृतीचा संसार हा नवीनच निर्माण होऊं पाहत आहे, असें याच इतिहासावरून स्पष्ट होतें. इतकें सांगून वेदकालीन आर्थिक जीवन व मानसिक संपत्ति काय होती, हें तर्कतीर्थ थोडक्यांत सांगतात. समाजांत सुरू असलेल्या विचारक बुद्धीचा परिणाम वेदकालीन प्रचलित असलेल्या कल्पनांवर होऊन त्यांचें स्वरूप पालटलें. त्याविषयीं सांगतांना त्यांनीं विद्यांचा परामर्श घेतला आहे. हा परामर्श त्रोटकच असल्यामुळें एकाद-दुसऱ्या विद्येसंबंधींच बाराव्या-सतराव्या शतकापर्यंतचें त्यांनीं विवेचन केलेलें आहे. पुऱ्या अठरा किंवा चौदा विद्यांचा यांत समावेश झालेला नाहीं. वैदिक समाजसंस्थेचें आविष्करण करतांना स्वाभाविकच वर्णव्यवस्था व जातिभेद यांवर भर दिला आहे. या समाजसंस्थेच्या इतिहासासंबंधींहि असेंच आहे. म्हणजे वैदिक कालानंतरच्या इतिहासांत तर्कतीर्थ फारसे शिरलेले नाहींत. चातुर्वर्ण्य वृत्तिमूलक व आचारभेदमूलकच आहे हा त्यांचा निष्कर्ष आहे. याच्याशीं माझा तीव्र मतभेद आहे. तरी पण या विषयावर माझा स्वतंत्र ग्रंथ[2] प्रसिद्ध

---

१ "वैदिक संस्कृतीचा विकास" लेखक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्राज्ञपाठशाळा-मंडळ-ग्रंथमाला, वांई (१९५१), पानें २६०, किंमत ६ रु.

२ 'Caste and Class in India' by G. S. Ghurye. (1950).








झालेला असल्यामुळें मतभेदाची छाननी येथें प्रशस्त नाहीं.

**नागवंशांत मातृप्रधान कुटुंबव्यवस्था नव्हती**

कुटुंबव्यवस्थेसंबंधीं पाहतांहि असेंच दिसून येतें. त्याहि संस्थेचा विकास तर्कतीर्थांनीं वैदिक कालापुरताच सांगितला आहे. वेदपूर्वकालीन मातृप्रधान समाजाचीं कांहीं सूचक लक्षणें पितृ-प्रधान वैदिक संस्कृतींतून डोकावतात असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे. अर्जुन-उलूपी विवाह व 'त्यांचा पुत्र' बभ्रुवाहन याचा मातृगृहीं वास, तसेंच जरत्कारु नांवाच्या भार्गव ब्राह्मणाचें वासुकि नागाच्या जरत्कारु नांवाच्या बहिणीशीं लग्न व त्यानंतर त्याचा मेहुणगृहींचा वास—हीं अवैदिक नाग-समाज मातृप्रधान असल्याचीं उदाहरणें म्हणून दिलीं आहेत. मातृप्रधान समाजांत साधारण रीत्या बाईचा भाऊ हा कर्ता पुरुष असतो. कोणत्याहि बाईचा नवरा किंवा बाप यांना त्यांत स्थान नसतें. महाभारतांत उलूपी ही ऐरावत नागाच्या पुत्राची विधवा स्त्री होती असें सांगितलें आहे. ती कौरव्य नागाची मुलगी होती. कौरव्य नागाची मुलगी ऐरावत नागाच्या घरीं लग्न होऊन गेली याचा अर्थ निदान त्या तरी नागकुलांत मातृप्रधान कुटुंब-व्यवस्था नव्हती असाच होतो. शिवाय, विधवा उलूपी भटकणाऱ्या अर्जुनावर भाळली व संभोगेच्छेनें तिनें त्याला आपल्या घरीं ओढून नेलें. तेथें तिचा सासरा ऐरावत नाग योग्यशा वंशवृद्धीच्या लालसेनें भाळला गेला व त्यानें पुत्रोत्पत्तीसाठीं उलूपीला अर्जुनाशीं गांधर्वविवाहानें बद्ध होण्यास परवानगी दिली तर ती गोष्ट मातृप्रधान कुटुंबव्यवस्थेची द्योतक होते हें कसें काय? गांधर्वविवाहासारखा सुटकतुटक लैंगिक संबंध आर्यांत पूर्वीपासून चालत आलेला होता. पुत्रोत्पत्तीसाठीं नियोग ही तर सर्वमान्य प्रथा होती. स्मृति-ग्रंथांतून सुद्धां सांगितलेल्या अनेक पुत्रांपैकीं कानीन व गूढज हे प्रकार, पुत्रोत्पत्तीसाठीं आर्य लोक कोणतीहि लैंगिक व्यवस्था मान्य करीत असत, हेंच दर्शवितात.

तर्कतीर्थांच्या या उदाहरणांत याहूनहि मोठी गफलत आहे. महाभारतांत बभ्रुवाहन हा उलूपी-अर्जुनाचा मुलगा सांगितला नसून तो चित्रांगदा-अर्जुनाचा मुलगा सांगितला आहे. उलूपी-अर्जुनाचा मुलगा इरावान् आहे. अर्जुन विवाहानंतर थोड्याच दिवसांत कामामुळें व घरच्या ओढ्यामुळें उलूपीकडून पळून गेला आणि इरावान् हा आपल्या आईच्या पहिल्या नाग नवऱ्याच्या घरींच वाढला. यांत मातृप्राधान्य कुठें आलें? आतांच सांगितल्याप्रमाणें बभ्रुवाहन हा अर्जुनाचा मुलगा खरा; तथापि, महाभारतांतील वर्णनाप्रमाणें तो अर्जुनानें मणिपूरची राजकन्या चित्रांगदा हिच्या ठायीं उत्पन्न केला होता. चित्रांगदेचा बाप राजा होता. म्हणजे मणिपूरची राज्यव्यवस्था मातृप्रधान नव्हती. अर्जुनासारखा योद्धा भटकत भटकत त्याच्या राज्यांत येऊन पोंचला. त्याच्या घरीं त्याची उपवर कन्या होती. तिला त्यानें 'पुत्रिका' ठरवलेलीच होती. पुत्राभावीं त्याला वंशवृद्ध्यर्थ दौहित्राची इच्छा होणें स्वाभाविक होतें. तो दौहित्र अर्जुनासारख्या वीर योद्ध्याच्या पोटीचा असावा असें त्याला वाटलें तर त्यांत त्या काळच्या मानानें अनार्य किंवा मातृप्रधान काय झालें? अर्जुनाचे हे किंवा अन्य विवाह वा लैंगिक संबंध घडून आले, तशा तऱ्हेचे विवाह परवां-परवांपर्यंत बंगाल्यांतील कुलीन ब्राह्मणांत चालू होते. तेथें अनुलोम विवाहाची प्रथा जोरांत असल्यामुळें एखाद्या चांगल्या ब्राह्मण, वैद्य किंवा कायस्थ माणसाला त्याच्या जातींतील पण खालच्या थराच्या दोन-चार नव्हे पण सात-आठपर्यंत निरनिराळ्या जागीं राहत असलेल्या बायका असत.

जरत्कारूची गोष्ट जरा विलक्षणच आहे. आणि जरत्कारू नागीण ही आपला भाऊ वासुकि नाग याच्या घरीं होती हेंहि खरें आहे. परंतु भावाचें घर म्हणजे जन्मसिद्ध हक्कानें मिळालेलें बापाचें घर कीं आईचें घर याविषयीं आपणांस कांहींच माहिती नाहीं. कथेंतसुद्धां जरत्कारू हा जरा विचित्रच ब्राह्मण दाखविलेला आहे. स्वतःवर जबाबदारी न घेतां त्यास पितृऋण फेडतां आलें तर पाहावयाचें होतें. बायको गर्भार राहिल्यावर थोड्याच दिवसांत कांहीं सबब सांगून तो तेथून पळून गेला. आतां एवढें खरें कीं, त्याचा मुलगा आस्तिक हा मातुलकुलवर्धक झाल्याचें कथेंत








सांगितलेलें आहे व हेंहि तेवढेंच खरें कीं, आस्तिकाला कुठेंच नाग म्हटलेलें नाहीं. तसेंच जनमेजयसत्राच्या वेळीं मातुलकुलाचें त्यानें जें रक्षण केलें तेंहि आईच्या आज्ञेवरूनच.

याविरुद्ध दुसरींहि उदाहरणें आहेत. पांडवांची आई कुंती ही आर्यक नांवाच्या नागाच्या मुलीची मुलगीच होती. अर्थात् आर्यक-नागाच्या वंशांत तरी मातृप्राधान्य असणें शक्य दिसत नाहीं. नागकन्येचा सर्वांत प्राचीन उल्लेख हा ऐक्ष्वाक पुरुकुत्साच्या चरित्रांत येतो. भागवतांत पुरुकुत्सानें नागशत्रु गंधर्वांचा निःपात केल्याचें सांगितलें आहे. त्याची पत्नी नागकन्या नर्मदा ही होती. याची दुसरी पत्नी कुठेंहि सांगितलेली नाहीं. आणि त्याच्या तीन पुत्रांपैकीं त्रसद्दस्यु आणि अनरण्य हे फार प्रसिद्धच आहेत. म्हणजे नागकन्या नर्मदा ही आपल्या पतीकडे त्याच्याबरोबरच राहावयास गेली असली पाहिजे. पुरुकुत्ससुद्धां एक प्रसिद्ध सम्राट् होता आणि त्याचा बाप मांधाता हा एक मोठा चक्रवर्ती होऊन गेला. मांधाता मनूपासून २४ वा असून, पुरुकुत्स जनमेजयाआधीं ५० पिढ्या होऊन गेला. म्हणजे एवढ्या प्राचीन काळीं सुद्धां नागांत मातृप्रधान कुटुंबव्यवस्था होती असें म्हणावयास कांहींच आधार नाहीं. एकंदरींत नागवंशांत मातृप्रधान कुटुंबव्यवस्था होती हें म्हणणें कपोलकल्पितच दिसतें !

## बहुपत्नीक समाजांत मातृक नांवें

गरुड हेंहि मातृवंशीय होते असें सांगून वैदिकांच्या मातृप्राधान्याचें किंवा मातृवंशीयत्वाचें सूचक म्हणून आदित्यांचें उदाहरण दिलें आहे. आदित्य म्हणजे अदितिपुत्र. ज्या अर्थीं त्या कुळाला मातृक नांव दिलेलें आहे, त्या अर्थीं तें कूळ मातृवंशीय किंवा मातृप्रधान असलें पाहिजे अशी लक्ष्मणशास्त्र्यांची विचारसरणी. मातृक नांवावरून मातृप्राधान्य प्रस्थापित होतें असें जर लक्ष्मणशास्त्र्यांना वाटत होतें, तर त्यांनीं पाणिनि सुद्धां मातृप्रधान कुटुंबांतीलच मुलगा होता, असें आदित्यांच्या मानानें अलीकडचें उदाहरण द्यावयाला हरकत नव्हती. तें जास्त परिणामकारक झालें असतें. पतंजलींनीं पाणिनींचा दाक्षीपुत्र म्हणून उल्लेख केलेला आहे. ज्या कथांतून अदितीचे आदित्य सांगितलेले आहेत, त्याच कथांतून अदिति ही कश्यपाची एकच बायको नसून दुसऱ्याहि त्याच्या अनेक बायका सांगितल्या आहेत. आणि त्या बायकांची प्रजा अदितीच्या मुलांप्रमाणें मातृक नांवानेंच उल्लेखिलेली आहे. उदाहरणार्थ, काद्रवेय, दानव, इत्यादि.[३] आधुनिक काळांत महाराष्ट्रांतील शातवाहनांच्या लेखांत गौतमीपुत्र, वासिष्ठीपुत्र, अशीं राजांचीं नांवें प्रसिद्धच आहेत. उपनिषदांत कृष्णाला देवकीपुत्र म्हणून उल्लेखिलेलें आहे. रामाला अजून आपण कौसल्यानंदन म्हणतोंच. ह्या सर्व उदाहरणांचा साकल्यानें विचार करतां असें दिसून येतें कीं, बहुपत्नीक समाजांत व त्यांतल्या त्यांत अनुलोम विवाहपद्धतीनें विवाहित अशा स्त्रिया असलेल्या बहुपत्नीक समाजांत, मातृक नांवें अधूनमधून आढळून येणें ही कांहीं विसंगत गोष्ट नव्हे. ह्या आनुलोमिक बहुपत्नीकत्वामुळें पंजाबांत परवां-परवांपर्यंत चुंडेवंड नांवाची वारसापद्धति प्रचलित होती. चुंडेवंड म्हणजे साध्या मराठींत ' वेणीप्रमाणें वांटा. ' म्हणजे बहुपत्नीक माणसाचें धन त्याच्या पश्चात् त्याच्या मुलांमध्यें सारखें न वाटतां, प्रथम तें त्याच्या बायकांत वांटावयाचें व प्रत्येक बायकोचा भाग नंतर तिच्या मुलांत वांटावयाचा. या पद्धतीचे पडसाद ' पत्नीभाग ' या नांवाखालीं मधूनमधून धर्मशास्त्रांतसुद्धां उमटतात.

तर्कतीर्थांनीं शेवटीं जातां जातां एक ऋग्वेदीय ऋचा व तिजवरील यास्काचार्यांचें भाष्य यांचा उल्लेख करून दक्षिणेंत मातृप्रधान कुटुंबव्यवस्था होती, असें जवळजवळ स्पष्ट सांगितलें आहे. येथें त्यांनीं फारच गोंधळ केला आहे. " न्यायसभेंत आपला धनाचा भाग हक्कानें मिळविणारी स्त्री दाक्षिणात्य असते " असें लिहून त्यांनीं एवढा अर्थ मूळ ऋचेंतच आहे असें ध्वनित केलें आहे. मूळ ऋचेंत

३ वरच्या चार-पांच परिच्छेदांतील पौराणिक माहिती बहुतेक चित्रावशास्त्र्यांच्या ' प्राचीन चरित्रकोश 'वरून घेतली आहे.








दाक्षिणात्य हा शब्द नाहीं. यास्कांनीं अर्थ देतांना, 'दाक्षिणाजी' म्हणजे 'दाक्षिणात्य स्त्री' असें करते, असें सांगितलें आहे. आनंदाश्रमानें प्रकाशित केलेल्या निरुक्ताच्या प्रतींत ती बाई अपतिक व अपुत्रिक असली तर असें करते, असें यास्कांच्या भाष्यांत दिलें आहे. लक्ष्मणस्वरूप यांनीं आपल्या इंग्रजी भाषांतरांत वरील उतारा दुर्गाची टीका म्हणून दिला आहे. व उत्तर हिंदुस्थानांत प्रचलित असलेली एक चालहि दिलेली आहे. ती म्हणजे झोळी-भरणा ही होय. एखाद्या बाईचा नवरा वारल्यावर तिच्या बापाचें कुटुंब तिची पैशानें ओटी भरतें. यास्कांच्या मताप्रमाणें जरी घेतलें, तरी तर्कतीर्थांना त्यांत मातृप्राधान्य कां दिसलें हें समजत नाहीं. स्त्रियांचा दर्जा उच्च असणें व त्यांना कांहीं दायहक्क असणें हें कांहीं मातृप्रधान कुटुंबपद्धतीचेंच लक्षण म्हणतां येणार नाहीं. तसें असतें तर लक्ष्मणशास्त्र्यांना वैदिक आर्यांतच मातृप्रधान कुटुंबव्यवस्था होती, याचा पुरावा अशा आडमार्गांत शिरल्याशिवाय यास्कांतच सहजीं मिळाला असता! मुलीला वारसाहक्क असावा कीं नाहीं याचा यास्कांनीं ऊहापोह केलेलाच आहे. त्यांतून एके काळीं तो तसा होता असा सहज निष्कर्ष निघतो. यावरून वैदिक आर्यांत मातृप्रधान कुटुंबव्यवस्था होती असें त्यांना सहज विधान करतां आलें असतें!

### प्राकृत वाङ्मयांतील जीवनदृष्टि

'इतिहास-पुराणांची व रामायणाची संस्कृति' या व्याख्यानांत संस्कृत काव्य व नाट्य ह्यांचा उगम महाभारत, रामायण व भागवत यांतच आहे असें सांगून जातांजातां रामायणाला उपमानस्थानीं धरून भागवताला महाकाव्य म्हटलें आहे. काव्यनाटकांचा तुरळक परामर्श साधारण रीत्या त्यांच्या अपकर्षकालापर्यंत घेतला आहे. वाटेनें देशी भाषांनाहि उचलून धरलें आहे. एवढेंच नव्हे तर, त्या प्राकृत भाषांतून व द्राविड भाषांतून जन्मल्या असेंहि विधान केलें आहे. पुराणादिकांच्या काव्यगायनांत आधुनिक भाट-चारणादींच्या पूर्वाकृती असलेल्या सूत, मागध, वैदेह, शैलूष इत्यादि जमाती शूद्र होत्या याविषयीं तर्कतीर्थांना संशयसुद्धां नाहीं. एवढेंच नव्हे, तर पुराणें प्रथम त्यांनींच रचिलीं होतीं व तींहि प्राकृत भाषेंत होतीं असेंहि ते ठाम सांगतात. या अफाट सूत-मागध वाङ्मयांतील कांहीं भाग संस्कृतांत रूपांतरित झाला व बाकीचा नष्ट झाला. कांहीं भाग संस्कृतांत रूपांतरित होण्याचें कारण ब्राह्मणांनींहि—आणि त्याच विषयावर—तसलेंच पुराणवाङ्मय रचण्याचे प्रयोग चालविले होते व त्यांतच त्यांनीं या सूत-मागध प्राकृत पौराणिक वाङ्मयाला (चौरवृत्तीनें) विलीन करून घेतलें! प्राकृतांतील काव्य आणि नाटकें मात्र संस्कृत पंडित कवींच्या कृतींपुढें निस्तेज होऊन लुप्त झालीं. असें असतांहि म्हणजे हें वाङ्मय लुप्त असतांहि, तर्कतीर्थांनीं तें "सांसारिक जीवनाच्या विधायक व प्रवृत्तिमार्गी भावनांना व मूल्यांना अत्यंत प्राधान्य देणारें होतें" असें छातीठोक बजावलें आहे. एकीकडे प्राकृत नाटकें लुप्त झालीं असें तर्कतीर्थ सांगतात, तर दुसरीकडे दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांतील राजशेखराच्या प्राकृत 'कर्पूरमञ्जरी' नाटकाचा उल्लेख करतात. इतकेंच नव्हे तर, या नाटकांत उच्च अभिरुचि व मौलिकता यांचा अभाव असल्याचेंहि सांगतात. प्राकृतांतील 'गौडवहो'-सारखें लौकिक काव्य शिल्लक कसें राहिलें व जीवनाच्या विधायक भावनांना पोषक असलेलें बाकीचेंच वाङ्मय कसें लुप्त झालें याचा कांहींच थांगपत्ता तर्कतीर्थांनीं सांगितलेला नाहीं. प्राकृत वाङ्मयाच्या लुप्तीकरणांत 'गाथासप्तशती'ला तर्कतीर्थ विसरून गेले. निदान त्यांनीं तिचा उल्लेख केलेला नाहीं. 'गाथासप्तशती' हालाची असें समजलें जात असून, ती खिस्ती शतकाच्या पहिल्या ते चवथ्या शतकापर्यंत केव्हां तरी संपादिली गेली असें तज्ज्ञांचें मत आहे. आणि 'गाथासप्तशती' ही पुष्कळशी चोरटे शृंगार, शृंगारिक पाल्हाळ व कांहीं निषिद्ध शृंगारिक संबंध यांनीं पुष्कळशी भरलेली आहे. म्हणजे उपलब्ध प्राकृत वाङ्मयावरून तरी एकंदर प्राकृत वाङ्मय जीवनाच्या विधायक भावनांना पोषक असावें असें म्हणतां येत नाहीं. आतां 'मेल्या म्हशीला बारा शेर दूध' या न्यायानें प्राकृत वाङ्मय लुप्त झालें असावें असें








मानून, तें जीवनाच्या विधायक भावनांना परिपोषक होतें असें म्हणावयाचें असेल तर गोष्ट वेगळी !

### शिल्प-स्थापत्य-कलेंत जैनांचें व बौद्धांचें ऋण ?

बौद्ध व जैन धर्मांविषयीं लिहितांना मंदिर-विषयक स्थापत्यकला व मूर्तिविषयक शिल्पकला हीं वैदिक संस्कृतींत या पंथीयांनींच आणलीं व वाढीस लाविलीं असें सांगून, अबूवरील जैन दिलवाडा मंदिर स्थापत्यकलेच्या पूर्णैश्वर्याचें निदर्शक म्हणून तर्कतीर्थ सांगतात; व जैन आणि बौद्ध धर्मानें स्थापत्यकलेंत मिळविलेल्या विजयाबद्दल "हिंदु (भारतीय) संस्कृति स्वतःस नेहमींच धन्य मानीत राहील" असें आश्वासितात. मात्र चितोडगड येथील जयस्तंभाची व वडनगर येथील तोरणांची आपणांला आठवण असल्याची ग्वाही देतात. याव्यतिरिक्त त्यांनीं मुख्य कलांचा किंवा वेषभूषादि उपकलांचा कांहीं परामर्श घेतलेला नाहीं.

बुद्धाच्या मूर्ती गांधार वगैरे देशांत पहिल्यानें केल्या गेल्या व इसवी सनाच्या दुसऱ्या शतकानंतर आपल्या भारतांत अनुकरणानें बनविल्या जाऊं लागल्या, हें सर्वसाधारण मत तर्कतीर्थांना ग्राह्य आहे. ओडिसाच्या खारवेल राजानें इसवीसनापूर्वीं दुसऱ्या शतकांत मगध राजाचा पराभव करून "प्रथम तीर्थंकर किंवा आदिजिन ऋषभदेवाची मूर्ति मिळविली होती. मथुरा येथें इसवीसनपूर्व सहाव्या शतकांत जैन स्तूपांची निर्मिति झाली होती असेंहि कांहीं पंडितांचें म्हणणें आहे" असें सांगूनहि जैनांची कला बौद्धांनंतर निर्माण झाली असें विधान त्यांनीं केलें आहे. खारवेलाच्या लेखांत त्यानें परत आणलेल्या मूर्तीचें वर्णन 'नंदराजनीतं कलिंगजिनं' असें आहे. म्हणजे ही जिनाची मूर्ति पूर्वीं कलिंगांतच होती व ती नंदराजानें नेली होती. ती खारवेलानें इ. सनपूर्व दुसऱ्या शतकांत मायदेशीं परत आणून स्थापिली. नंदराज हा जरी शेवटचा नंद म्हणून समजला तरी त्याचा हा जिन पळविण्याचा दिग्विजय इ. सनापूर्वीं ३५० च्या फारसा अलिकडे येऊं शकत नाहीं. यावरून कलिंग देशांत जिनाची मूर्ति इ. सनापूर्वीं ३५० वर्षांपासून होती असें दिसतें. ती किती पूर्वींपासून होती हें आपल्याला माहीत नाहीं. तरी पण एकंदरींत कलिंग देशांत इ. सनापूर्वीं ५ व्या नाहीं तर ४ थ्या शतकांत मूर्ति घडवीत होते हें यावरून सिद्ध होतें. मथुरेचा स्तूप मात्र लक्ष्मणशास्त्री म्हणतात इतका जुना असूं शकत नाहीं. तो साधारणतः इ. सनापूर्वीं दुसऱ्या शतकांतीलच समजला जातो. म्हणजे स्तूपाची कल्पना बौद्धांनीं मूर्त केली व मूर्तिशिल्प जैनांनीं चालू केलें, असेंच म्हटलें पाहिजे.

जैनांच्या मंदिरस्थापत्यानें किंवा दिलवाडा मंदिराच्या श्वेतपाषाणांनीं चकित होऊन तर्कतीर्थांनीं रोमन किंवा मध्ययुगीन युरोपीय स्थापत्याला तर कमी लेखलेंच आहे, पण शिवाय हिंदु-भारतीय कलेच्या अस्तित्वालाहि ते पार विसरून गेले आहेत. दिलवाडा मंदिर हें एक फार सुंदर मंदिर आहे याविषयीं संशय नाहीं. पण तत्समकालीन मध्यभारतांतील खजुराहो येथील कंदार्य महादेवाचें देऊळ हें सुद्धां फार वाखाणण्यासारखें आहे. तेथील कोरीव कामांत लैंगिक बाष्कळपणा नसता तर तें माझ्यासारख्यानें तरी निदान मंदिरस्थापत्यकलेचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून दिलें असतें. याहिपूर्वीं दोन-अडीचशें वर्षांचें वेरूळ येथील खोदीव कैलासमंदिर हें श्वेतपाषाणासारख्या चित्तवेधक साहित्याच्या मदतीशिवाय जगांतील एक चमत्कृति म्हणून समजलें जातें. तेथील बारीकबारीक खोदकामसुद्धां अवर्णनीय शिल्पांत गणलें जातें. भासाच्या 'प्रतिमा' नाटकांत दशरथादि इक्ष्वाकूंच्या हुबेहूब— इतक्या हुबेहुब कीं ज्या वेळीं दशरथ मरणोन्मुख असल्याचें समजल्यावरून भरत परत येतो, त्या वेळीं अयोध्येच्या सीमेवरच असलेल्या इक्ष्वाकू देवकुलांतील दशरथाच्या मूर्तीस तो जिवंत दशरथच समजतो—मूर्ती उच्चशिखरीय देवळांत ठेवल्याचें वर्णन आहे. ही राजवंशीय प्रथा किती जुनी होती हें आपल्याला माहीत नाहीं. पण मूर्ती आणि त्याहि हिंदु देवतांच्या यापूर्वीं बऱ्याच काळापासून प्रचलित होत्या. पतंजलींनीं इ. सनापूर्वीं १५० वर्षें स्कंदाच्या मूर्ती बाजारांत विक्रीस असत, असें जातांजातां सांगितलें आहे. इ. सनानंतर ७ व्या शतकाच्या प्रारंभीं ह्यू-एन-त्सांग या चिनी यात्रेकरूनें शिवाच्या जवळजवळ १०० फूट उंचीची मूर्ति काशी येथें पाहिल्याचें लिहून ठेविलें आहे.







बौद्धधर्मी असूनसुद्धां त्या मूर्तींच्या दर्शनानें झालेलें समाधान त्यानें दडवून ठेविलें नाहीं. ती मूर्ति फारच वैभवशाली व बहारीची दिसत होती असें तो सांगतो. भारतीय हिंदु संस्कृतींत शिल्पकलेचीं, चित्रकलेचीं व स्थापत्यकलेचीं हीं व दुसरीं उदाहरणें असतांना तर्कतीर्थांचीं जैन व बौद्ध ऋणांबद्दलचीं विधानें जरा अवास्तवच वाटतात.

## मानव्यतेच्या साध्याकडे विकास

वैदिक धर्मकल्पनांचा व नीतिकल्पनांचा विकास हा या व्याख्यानांचा गाभा होय. त्याचा आविष्कार मानव्यतेचें तत्त्व आणि त्याची जाणीव हें अंतिम साध्य धरून केलेला आहे. वैदिकांच्या यज्ञांतूनच पुरुषादि एकेश्वरी कल्पना निघाल्या. तसेंच यज्ञाच्याच अनुषंगानें तार्किक बुद्धीच्या जोरावर आत्मा व ब्रह्म या पराकाष्ठेच्या गूढ पण प्रभावी अशा कल्पना निघाल्या व त्यांच्याभोंवतीं नीतितत्त्वें गोंवलीं गेलीं. म्हणजे उपनिषत्कालींच जीवनाचीं दोन ध्येयें निश्चित झालीं होतीं. तीं म्हणजे आश्रमी जीवन व दुसरें त्यागमय संन्यस्त जीवन हीं होत. आश्रमी जीवन निष्काम असावयास पाहिजे असेंहि ध्वनित केलें गेलें. आश्रमी जीवनाचा गाभा म्हणजे तीन ऋणें व चार पुरुषार्थ. एवढें सांगितल्यानंतर इतिहास-पुराणांच्या संस्कृतीच्या व्याख्यानांत नारायणीय धर्म, रुद्र-शिवाची आराधना व मूर्तिपूजा यांचा उद्गम व वाढ हीं थोडक्यांत सांगितलीं आहेत. विष्णूच्या अवतारांचा थोडाफार परामर्श घेऊन त्यांतील पांचसहा वैदिक आहेत असें दाखविलें आहे. कृष्णावताराचा फारसा विचार केलेला नाहीं. रामावतार मात्र रामायणांतील १ ल्या व ७ व्या कांडांतच अवतारपदवीस पोंचविला गेला व त्यामुळेंच तो हिंदूंचा देव बनला असें सांगितलें आहे. तुलसीदासाच्या रामायणाला दहा कोटी हिंदी भाषिकांचा वेद म्हणून उल्लेखून तुलसीदासाच्या नंतरच्या पिढींतल्या महाराष्ट्रीय तुकारामालाच भागवत धर्माचा कळस ठरविला आहे.

बौद्ध व जैन धर्मांचा विजय हा विषय याच्या नंतरच्या व्याख्यानांत तर्कतीर्थांनीं कां प्रतिपादिला याचा उलगडा होत नाहीं. शैव व भागवत पंथांचा उगम व अभिवृद्धि हीं योग्य तऱ्हेनें समजण्यासाठीं जैन व बौद्ध धर्मांच्या प्रसाराच्या ज्ञानाची जरूरी असते. कलादृष्ट्याहि जैन व बौद्ध धर्म शैव व भागवत पंथांपेक्षां निश्चितच आधींचे होत. व त्यांतच असामान्य व्यक्तींच्या जीवनाभोंवतीं धर्मकल्पना, नीतिकल्पना व अनुयायांची भक्ति भरतभूमींत पहिल्यानें दृढ झालेली आपणांस दिसते.

बौद्ध धर्म, निदान गौतम बुद्धाची विचारसरणी, ही औपनिषदिक विचारसरणीचेंच एक अंग आहे असें व्याख्यात्यांचें मत दिसतें व तें मला पूर्णपणें मान्य आहे. बौद्ध धर्मानें कुठें पुढें पाऊल टाकलें असेल तर तें तो धर्म विश्वव्यापी करण्याच्या मार्गानें होय. म्हणजे मानव्यतेच्या कल्पनेला धर्मकल्पनांत बौद्ध धर्मानें मूर्त स्वरूप दिलें.

तर्कतीर्थ सांगतात: इस्लामच्या आक्रमणाच्या वेळीं भारतीय संस्कृतीचें दौर्बल्य दिसून आलें व दीर्घकालीन इस्लामी राजवटीमुळें भारतीय समाजाचे दोन भाग पडले. तरी पण ते दोन्ही भाग म्हणजेच हिंदु व मुसलमान या जमाती "एकत्र गुण्यागोविंदानें नांदावयास लागल्या; व दोन्ही संस्कृतींच्या मध्यें सहकार्य व सहिष्णुता आली." "इस्लामी संस्कृतीनें (ला) भारतीय संस्कृतीला पराभूत करण्यांत यत्किंचितहि यश आलें नाहीं. हिंदूंनीं अखेर साधली!" ब्रिटिश अमदानीच्या जवळजवळ सुरुवातीसच 'हिंदुधर्मसंस्थेचें' म्हणजे वैदिक संस्कृतीचें पायाशुद्ध परिशीलन होण्यास सुरुवात झाली. त्या परिशीलनाचे महान् अध्वर्यु राजा राममोहन रॉय हे होत. त्यांनीं १८२८ सालीं बंगालमध्यें "ब्राह्मसमाजाच्या स्थापनेनें हिंदी नवयुगाची प्रभात घोषित" केली. पण ही नवयुगप्रभात-घोषणा फुसकी ठरली, हें तर्कतीर्थच पुढें कबूल करतात. म्हणजे बंगाली ब्राह्मसमाजीयांना हिंदु समाजरचनेंत किंवा हिंदु धर्मकल्पनांत म्हणण्यासारखा बदल करतां आला नाहीं व तो समाज आतां जवळजवळ मरणोन्मुखच आहे.

## राममोहन रॉय ते मानवेन्द्रनाथ रॉय

एकीकडे राममोहन रॉय हे आधुनिक भारताचे द्रष्टे तर दुसरीकडे त्यांच्यानंतर ४५ वर्षांनीं म्हणजे १८७३ सालीं पुणें येथें सत्यशोधक समाजाची



अनुक्रमणिका








स्थापना करणारे ज्योतीबा फुले मागसलेल्या जमातींतून उत्पन्न होणाऱ्या चळवळीचे नेते म्हणून महत्त्वाचे. "आगरकर राष्ट्रवादी होते व फुले मानवतावादी होते." "राष्ट्रभेदाचीं बंधनें यःकाश्चित् समजुन त्यांना उल्लंघून जाणारा मानव्याचा अगाध प्रेमसमुद्र म्हणजे ज्योतीबा होय." म्हणून, जरी जोतीबांनीं आपल्या चळवळीनें 'एक प्रकारचा वर्गविग्रहच' निर्माण केला होता आणि तो जरी तर्कतीर्थांना योग्य वाटत नसला, तरी ज्योतीबा फुले आधुनिक भारतांतील राममोहन यांच्या बरोबरीचे अतएव अतृतीय 'तपस्वी नेता'! ही मानव्यता किंवा यापुढचीहि मानव्यता महात्मा गांधींनींच पुकारली व आचरली असें तर्कतीर्थांचें निश्चित मत असतांहि व अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नावर लोकमान्य टिळकांची वैचारिक अनिश्चिति व महात्मा गांधींची व्यावहारिक धडाडी दाखवूनहि, शेवटीं नव्या युगाच्या भारतीय द्रष्ट्यांच्या यादींत राजा राममोहन रॉय यांच्यानंतर लोकमान्य टिळक यांचेंच नांव तर्कतीर्थांनीं घातलें आहे. असें करण्याचें कारण तर्कतीर्थांची दृष्टि नुसत्या मानव्यतेकडून आतां तत्त्वज्ञानाकडे वळली हें होय. त्यांच्या मतें विसाव्या शतकांत भारतांत तत्त्वज्ञानाला पुढें आणणाऱ्या विचारप्रवर्तकांत लोकमान्य टिळक, योगी अरविंद घोष, महात्मा गांधी व भाई मानवेन्द्रनाथ रॉय हेच स्वतंत्र विचाराचे होत.

याचा अर्थ असा नव्हे कीं, तर्कतीर्थ बाकी सगळ्यांना विसरून गेले. निदान दयानंदसरस्वतींची तरी त्यांना आठवण झालीच आहे. दयानंदांनीं आपल्या 'आर्यसमाजा'ची स्थापना वेदांवर बोट ठेवून १८७५ सालीं केली, तरी तर्कतीर्थांनीं ज्योतिबा फुल्यांच्या अगोदरच त्यांचा समाचार घेतला आहे. मला वाटतें कीं, वेदार्थावर अवलंबून असलेली चळवळ बुद्धिवादी गणली जात नसल्यामुळें त्याचा थोडक्यांत परामर्श घेऊन, तर्कतीर्थांना आपल्या मुख्य मुद्द्याकडे वळावयाचें होतें. या चळवळीला ते 'ब्राह्म-प्रार्थना-समाजां'च्या चळवळींपेक्षां जास्त कार्यक्षम व परिणामकारक म्हणून प्रशंसापत्र देतात. इतकेंच नव्हे तर, ते असेंहि कबूल करतात कीं, "आधुनिक हिंदुत्वाच्या चळवळीचें सामर्थ्यशाली नेतृत्व आर्यसमाजाकडे गेलें आहे." असें असूनहि या प्रभावशाली चळवळीची त्यांनीं एकाच परिच्छेदांत बोळवण केली आहे. आर्यसमाजाच्या रूपानें वैदिक संस्कृतीचा धर्म एका तऱ्हेनें विश्वव्यापी होतो हेंहि ते विसरून गेले. आर्यसमाजांत कुठल्याहि परधर्मीयाला येतां येत असून, तो त्या मार्गें वैदिक धर्मकल्पनांचा व संस्कृतीचा भागीदार होऊं शकतो, याचा त्यांनीं उल्लेखसुद्धां केलेला नाहीं.

नवयुगाच्या द्रष्ट्यांपैकीं राजा राममोहन रॉय यांची कामगिरी म्हणजे प्रचलित सामाजिक संस्था बदलणें व नव्या निर्माण करणें ही माणसाची जबाबदारी असल्याची घोषणा व जाणीव करून देणें ही एक; तसेंच, विवेकबुद्धीलाच प्रमाणाच्या महत्पदावर चढविणें ही दुसरी होय. लोकमान्यांनीं 'गीतारहस्या'च्या द्वारें पाश्चात्त्य संस्कृतीचें नीतिशास्त्र हें भारतीय संस्कृतीच्या नीतिशास्त्राहून भिन्न नसल्यामुळें मानवजातीचें नीतिशास्त्र हें एकच आहे हें प्रस्थापित केलें व कर्मयोगाला उचलून धरलें. हीच त्यांची कामगिरी तर्कतीर्थांनीं भारतीय आध्यात्मिक विचाराला नवी दिशा दाखविणारी म्हणून उल्लेखिलेली आहे. तरी पण त्यांची कामगिरी थोडीबहुत अपुरीच होती व ती योगी अरविंद घोष यांनीं पुरी केली असें तर्कतीर्थांचें मत आहे. योगी अरविंदांनीं मानवजातीची एकता हेंच अबाधित तत्त्व आहे हा सिद्धान्त गृहीत धरला आहे. महात्मा गांधींचें कार्य म्हणजे अध्यात्ममार्ग पूर्ण व्यवहारांत आणण्याचें होय. त्यांनीं मानव्यता तर उचलून धरलीच, पण शिवाय राजकारणी परंपरेच्या विरुद्ध जाऊन शुद्ध साधनांचा उपयोग करून राजकीय ध्येय साधतां येतें, हा महत्त्वाचा सिद्धान्त स्थापित केला. स्वतःला लागणाऱ्या वस्तू स्वतःच उत्पन्न कराव्या व त्या द्वारें मानव्यता जगवावी व अनुभवावी म्हणून त्यांनीं एक नवीन आश्रमसंस्था निर्माण केली. त्यांचें साध्य भौतिक शक्तीला आत्मशक्तीच्या नियंत्रणाखालीं आणण्याचें होतें. असें बजावूनसुद्धां या सर्व कार्यांचा काय परिणाम झाला हें तर्कतीर्थांनीं सांगितलेलें नाहीं किंवा यांतील बराचसा भाग हा वैदिक संस्कृतीच्या कक्षेंत कसा येतो हेंहि सांगितलेलें नाहीं. वैदिक







संस्कृतीच्या लोकांनीं महात्म्याचें अनुयायित्व पत्करलें म्हणून तो वैदिक संस्कृतीचा विकास ठरला असता. परंतु तर्कतीर्थ प्रांजलपणें कबूल करतात कीं, "आतां गांधींचा अस्त झाल्यावर गांधींच्या ध्येयवादाचा प्रकाशहि पूर्णपणें मावळला आहे."

यापुढची मानवतावादाची पायरी भाई मानवेंद्र रॉय यांनीं गांठली, असें तर्कतीर्थांचें म्हणणें आहे. कारण भाईंची वैचारिक चळवळ वैज्ञानिक दृष्टिकोनाला प्राधान्य देत असून ती अखिल मानवजातीच्या एकतेवर उभारलेली आहे. त्यांची विचारसरणी भूतकालीन ध्येयांना कुठल्याहि सजावटींत पुरोगामी म्हणून समजत नाहीं. कारण, भूतकालाच्या अवशेषांनीं भूतकालाचीं बंधनेंच अधिक बळकट होतात. त्यांच्या विचारमालिकेंत वैज्ञानिक दृष्टिकोनानें अध्यात्मवादी तत्त्वज्ञानाला फाटा दिला आहे. "पुरुषोत्तम किंवा परमात्मा हें माणसानेंच स्वतः-च्या स्वरूपाचें कल्पनेनें वाढविलेलें व भाविलेलें अतिशयोक्तिपूर्ण रूप आहे" असा त्यांच्या तत्त्वज्ञानाचा निष्कर्ष आहे. भाई रॉय यांच्या विचारसरणीचे अनुयायी आपल्या भारतांत फार थोडे आहेत व ते सर्व वैदिक संस्कृतीच्या अनुयायांपैकीं आहेत असेंहि नाहीं. भाई रॉय तर परमात्म्याला झुगारून देतात. जेथें परमात्मा नाहीं तेथें आत्मा आहे कीं नाहीं हें विचारण्याची सोयच नाहीं. त्यांच्या तत्त्वज्ञानांत बेंथॅम, मिल, स्पेन्सर यांच्या तत्त्वज्ञानाहून वेगळें काय आहे व तसें कांहीं नसेल तर तें वैदिक संस्कृतीच्या विकासांत कसें बसूं शकतें याचा उलगडा होत नाहीं. वैदिक संस्कृतीचा कुठलाहि विकास आध्यात्मिक असल्याशिवाय राहूं शकत नाहीं. चार्वाकादि शुद्ध जडवाद किंवा बौद्धादि शुद्ध अनात्मिक नीतिवाद या वैदिक संस्कृतीच्या फांद्या कांहीं काळ फोंफावल्यानंतरसुद्धां भरतभूच्या आत्म्यानें वैदिक संस्कृतीच्या मूळ वृक्षाच्या विकासार्थ त्यांना छाटून टाकलें. तर्कतीर्थसुद्धां एकंदरींत पाहतां आध्यात्मिक जीवनाचे पुरस्कर्ते असल्यामुळें, अध्यात्मवादाला ते फांटा देतील असें वाटत नाहीं. असें असतां भाई मानवेंद्र रॉय व त्यांची विचारसरणी हीं वैदिक संस्कृतीच्या विकासांत महत्त्वाच्या स्थानीं कशीं बसूं शकतील ?

## 'इष्टापूर्तां'तील मानव्य

वैदिक यज्ञसंस्थेंत यज्ञकर्ता हा यज्ञ-अधिष्ठात्री देवतेबरोबर देवाण-घेवाण करण्याच्या नात्यानें किंवा पद्धतीनें वागत होता असें म्हणावयास हरकत नाहीं. दैवतेंहि खूप होतीं. यज्ञधर्मांतून निघालेल्या तत्त्वज्ञानांत, तर्कतीर्थांनीं सांगितल्याप्रमाणें, उपनिषत्कालींहि दोन दृष्टिकोन व दोन आदर्श दिसून येतात. निष्कामकर्मी गृहस्थ आपलीं तीन उपजात ऋणें फेडीत, नवीनच प्रचलित झालेल्या आश्रमपरंपरेंतून अथवा आश्रमव्यवस्थेच्या मार्गानें जाणें श्रेयस्कर समजत असे. या तीन ऋणांत मनुष्यऋण हें एक होतें. त्या ऋणाच्या फेडीप्रीत्यर्थ गृहस्थानें अतिथींना व क्षुधितांना अन्न द्यावयाचें असे. त्या काळीं इष्टापूर्त ही कल्पना होतीच. पण इष्टापूर्ताची व्याप्ति यज्ञयागादि व ब्राह्मणदक्षिणादि कर्तव्यापलीकडे गेली नव्हती, असें दिसतें. महाभारताच्या काळीं निष्कामकर्माची महति तर वाढलेली होतीच, पण शिवाय इष्टापूर्ताची व्याप्तीहि जवळजवळ ११ व्या शतकांतल्या व्याप्ती-एवढी वाढलेली होती असें दिसतें. म्हणजे 'पूर्त' या शब्दानें विहिरी, तलाव खणण्यासारखीं लोकोपयोगी कामें दर्शविलीं जात होतीं. आणि इष्टापूर्त हें गृहस्थाचें एक कर्तव्य होतें. म्हणजे पहिला आदर्श जें गृहस्थी निष्काम जीवन त्यांत अतिथींना, क्षुधितांना अन्न देणें, विहिरी, तलाव खोदण्यासारखीं लोकोपयोगी कामें करणें हें एक महत्त्वाचें कर्तव्य होऊन बसलें होतें. यांतच वैदिक धर्मकल्पनांचा दुसऱ्या पायरीचा विकास समजला पाहिजे. आणि त्यांत मानव्यता-तत्त्वाचा थोडा तरी समावेश होत असल्यामुळें मानव्यता-तत्त्वाच्या अनुरोधानें टाकलेलें हें वैदिक संस्कृतीचें पहिलें पाऊल होय. अतिथींना व क्षुधितांना अन्न देणें, तृषार्तांना पाणी देणें, पीडितांचें सांत्वन-समाधान करणें, व्याधिग्रस्तांना उपचार करणें व एकंदरींत दुःखितांचें दुःख हलकें करण्याचा यत्न करणें हें मानव्यतेचें एक मुख्य अंग आहे. गौतमबुद्धानें हेंच परदुःखनिवारणाचें तत्त्व व्यवहारांत आणून त्याचा प्रसार केला.

## कृष्ण, शिव आणि विष्णु यांची उपासना

येथपर्यंत वैदिक उपास्यदैवतांचा लोप झालेला










नसला, तरी त्यांना गौणत्व तर आलेलेंच होतें. त्यांची जागा कोणी घ्यावयाची हें त्या काळच्या वैदिक संस्कृतीपुढें एक कोडेंच होतें. तर्कतीर्थांनीं वैदिक संस्कृतीच्या विकासाचीच मीमांसा करण्याचें ठरविल्यामुळें स्वाभाविकपणेंच वैदिक संस्कृतीच्या प्रसारासंबंधीं त्यांनीं कांहीं विवेचन केलें नाहीं. आणि अशा तऱ्हेच्या अभ्यासाला पुरेशी साधन-सामग्री उपलब्धहि नाहीं. म्हणून या मधल्या काळांत म्हणजे बुद्धाच्या उदयापासून तों भागवत धर्माच्या प्रादुर्भावापर्यन्त कोणतीं उपास्य दैवतें समाजांत प्रचलित् होतीं हें निश्चित सांगतां येत नाहीं. उपास्य दैवतावरून समाजास सम्मत असलेल्या व समाजांत परिपोष होत असलेल्या व्यक्तिगत व सामाजिक गुणांचा थोडा तरी बोध होतो. समाजांतील वरच्या थरांत महादेव किंवा शिव व स्कंद हीं उपास्य दैवतें बहुधा प्रचलित होतीं असें म्हणावयास थोडाफार पुरावा मिळतो. सातव्या शतकापर्यन्त भारतीयांच्या बौद्धेतर उत्तर हिंदुस्थानी समाजांत शिवाखेरीज दुसऱ्या दैवतांच्या डोळ्यांत भरण्यासारख्या मूर्ती किंवा मंदिरें नव्हतीं हें ह्यू एन त्सिआंग याच्या लेखनावरून दिसून येतें. बहुजनसमाजांत मरीआई, जोखाई व तत्सम देवतांनाच प्राधान्य होतें. शैवपंथाची जी कांहीं माहिती उपलब्ध आहे तिजवरून अशा पंथांचे आचार थोडेफार अनैतिक, निदान अशिष्ट तरी होते. पुढील इतिहासांत वैदिक संस्कृतीच्या अभिमान्यांना व प्रचारकांना प्राकृत जनांच्या मरीआई, जोखाई इत्यादि पंथांशीं व अप्राकृत जनांच्या अशिष्ट संप्रदायांशीं झुंजून पुढें मार्ग काढावयाचा होता. त्या झटापटींत बहुतकरून शिवाच्या मूर्तीऐवजीं शिवलिंग हें उपास्य दैवत बनलें असेल.

रामकृष्णपंत भांडारकरांच्या मतें सात्वत धर्म व वासुदेव-कृष्ण-उपासना हीं जवळजवळ बौद्ध धर्माच्या वेळींच प्रचारांत आलीं. पण ग्रीक मेगॅस्थिनिस्नें कृष्णाची पूजा शौरसेनी लोकांतच विशेषेंकरून प्रचलित असल्याचें नमूद केलें आहे. महाभारतांत पुष्कळच ठिकाणीं आढळत असलेले वासुदेव-कृष्णासंबंधींचे उल्लेख वासुदेव-कृष्ण त्या वेळचें दैवत नव्हतें असें दर्शवितात. इ० सनापूर्वी २०० वर्षांपासून तरी वासुदेवाची पूजा प्रचलित आहे. पांचव्या शतकापासून गुप्त महाराजांपैकीं कांहींनीं स्वतःला परमभागवत म्हटलेलें आहे. सहाव्या शतकाच्या सुरुवातीस वराहमिहिरानें बलराम व कृष्णाची मूर्ति कशी करावी हें सांगितलें आहे. याच काळची मध्य-भारतांतील देवगड येथलि शेषशायीची सुंदर मूर्ति उपलब्ध आहे. सातव्या शतकाच्या प्रारंभींची असलीच शेषशायीची मूर्ति मद्रासकडेहि आढळते. वेरूळचें दशावतारमंदिर व त्यांतील शेषशायीची सलक्ष्मीक मूर्ति हीं बहुतकरून आठव्या शतकाच्या मध्यांतील आहेत. अकराव्या शतकापर्यंत कृष्णाचीं बालक्रीडादर्शक अशीं कांहीं शिल्पें असलीं, तरी एकंदर विचार करतां विष्णु, त्याचें रूप वासुदेव व अवतार कृष्ण हींच भागवत धर्मांतील उपास्य दैवतें होतीं.

भागवत-धर्माच्या मोठ्या प्रचारकांपैकीं पहिले रामानुज होत. त्यांचा जन्म इ. स. १०१७ मध्यें झाला असें मानतात. त्यांच्या पद्धतींत उपास्य दैवत शेषशायी नारायण असून त्याची उपासना श्री, भू व लीला या स्त्री-दैवतांसहित सांगितलेली आहे. रामानुजाचार्यांनंतरचे मोठे वैष्णवाचार्य म्हणजे मध्वाचार्य. हे रामानुजानंतर शंभर वर्षांनीं होऊन गेले. त्यांच्या पद्धतींत विष्णूची सहचारिणी लक्ष्मी असली आणि विष्णु परमात्म्यासारखीच ती नित्य मुक्त असली, तरी त्यांच्या उडीपी येथील मुख्य मंदिरांतील उपास्य मूर्ति कडगोळ कृष्णाची म्हणजे रवी हातांत घेतलेल्या कृष्णाचीच आहे. यांच्याहून १४–२० वर्षांनींच लहान असलेल्या निम्बार्कांनीं मूळ महाराष्ट्रांतील पैठणहून निघून वृंदावन गांठलें व तेथें राधाकृष्ण या उपास्यदैवताचा प्रचार सुरू केला. तेथपासून उत्तरेकडील भागवत धर्मांत निरनिराळ्या तऱ्हेचे घोटाळे सुरू झाले. या उपास्य दैवतामुळें भागवत-धर्मीयांत भोळ्या भाविकपणाचा बेसुमार प्रसार झाला व त्याच्या अनुषंगानें थोडेफार अशिष्ट किंवा अनैतिकहि प्रकार उपासनेंत व त्या द्वारें जीवनांत घुसले.

श्रीमद्-आद्यशंकराचार्यांनीं शैवपंथांतील अशिष्ट प्रकारांना बराचसा आळा घातला. वैदिक धर्म-








कल्पनांच्या विकासाच्या दृष्टीनें पाहतां त्यांची कामगिरी चार तऱ्हेनें महत्त्वाची ठरते. त्यांनीं बौद्ध धर्माची पीछेहाट करण्याच्या कामीं बराच हातभार लावला; धार्मिक अशिष्ट प्रकारांना आळा घातला; भारताच्या चारी दिशांस मठ स्थापन करून तेथील मठाधिपतींनीं विद्वत्ता आणि विचार यांच्या साहाय्यानें आपल्या सभोंवतालच्या धर्मविकासांत व्यवस्थितपणा आणावा अशी योजना केली; व असंघटित असलेल्या संन्यासमार्गाला दसनामी संन्याशांच्या द्वारें संघटित केलें. अशा तऱ्हेनें शैव-पंथांचें शुद्धीकरण होऊन त्यांना अद्वैत तत्त्वज्ञानाची जोड मिळाल्यामुळें वैदिक धर्मकल्पनांचा एका तऱ्हेनें प्रागतिक विकास झाला. भागवत धर्माच्या विचार-वंत प्रवर्तकांनीं विष्णु व तत्सम अशैव दैवतें उपासनेंत आणून दुसऱ्या तऱ्हेनें विकास घडविला.दोन्ही पंथांतून पुढें अशिष्ट व कांहीं अंशीं अनैतिक उपसंप्रदाय निघाले. त्यांपैकीं राधाकृष्ण उपास्य दैवतामुळें जे घोटाळे माजूं लागले, त्यांचा प्रतिकार करण्याचे निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या ठिकाणीं प्रयत्न झाले. त्यांतील पहिला प्रयत्न म्हणजे राधाकृष्ण दैवताऐवजीं रामसीता हें दैवत प्रस्थापित करणें हा होय.

### रामानंद, नरसी मेहता, एकनाथ

विष्णूचा एक अवतार म्हणून राम तिसऱ्या-चवथ्या शतकाच्या अगोदरच केव्हां तरी मान्यता पावलेला होता. तरी पण राम हें उपास्य दैवत झाल्याचें कोणतेंहि चिन्ह अकराव्या शतकापर्यंत उपलब्ध नाहीं, असें रामकृष्णपंत भांडारकरांनीं चाळीस वर्षांपूर्वींच निश्चित विधान करून ठेवलें आहे. रामोपासना जरी अकराव्या शतकांत केव्हां तरी सुरू झालेली असली तरी ती फारशी जोरांत कुठेंहि चालू नव्हती. रामाच्या उपासनेचा जोरानें पुरस्कार करून तिला सर्वसाधारण समाजा-पर्यन्त पोंचविण्याचें महत्कार्य रामानंदांनीं केलें. रामानंदांचा जन्म इ. स. १३०० चा समजतात. या रामानुजीय बैराग्यानें भागवत धर्माच्या मानव्यताप्रधान स्वरूपाचा पहिल्यानें आविष्कार केला. त्याच्या काळापर्यंत मानवतेचा जो नुसता पुकारा चालला होता तो त्यानें कृतींत आणून मानव्यतेच्या एका अंगाला तरी मूर्त स्वरूप दिलें. शूद्रांना भागवत धर्म खुला आहे हें नुसतें सांगत न राहतां, सभोंवतालच्या लोकांच्या विरोधाला न जुमानतां, त्यानें शूद्रांना दीक्षा देण्यास प्रारंभ केला. ती दीक्षा नुसत्या भागवतधर्माची नसून संन्यासदीक्षा होती. शूद्रांना संन्यासाश्रम खुला करणें हा वैदिक संस्कृतीचा विकासच असून तो धडधडीत मानव्यतेच्या दिशेनेंच आहे.

शुद्ध भागवतधर्मांत मानव्यतेच्या दिशेनें रामानंदांनंतर पुढचें पाऊल टाकणारे गृहस्थी संत होते. ते म्हणजे जुनागडचे नागर ब्राह्मण नरसिंह मेहता किंवा नरसी मेथा हे होत. या महापुरुषाचा जन्म श्री. कन्हैयालाल मुनशींच्या मतें इ. स. १५०० मध्यें झाला. भागवतधर्माच्या वैचारिक प्रणालीचा कळस यांनींच गांठला होता. भागवत धर्माचा वैचारिक कळस हा मान दुसऱ्या कोणासहि देतां येत नाहीं. महात्मा गांधींच्या मुखांत बसल्यामुळें ' वैष्णव जन तो तेने कहिये ' हें पद भारतांतील बहुजनसमाजाला परिचित झालें. त्या पदांत हा भागवतधर्माचा कळस पूर्णपणें दृष्टोत्पत्तीस येतो. तुकारामबोवांसारख्या परमभागवताच्या अभंगांत जीं तत्त्वें इतस्ततः विखुरलेलीं सांपडतात तीं सर्व तत्त्वें या पदांत एकत्रित चमकतात. हें पद नरसिंह मेहतांनीं तुकोबांच्या पूर्वीं जवळजवळ एक शतक रचिलें आहे. नरसिंह मेहतांच्या या शिकवणींत, परपीडेचें निरा-करण हें वैष्णव जनांचें अतएव भागवतधर्माचें ध्येय स्पष्ट आढळतें. मेहतांनीं स्वतः धेडांच्या घरीं भजन करून आपल्या ज्ञातिबांधवांकडून झालेला छळ सोसला. व्यवहार किंवा क्रियेच्या दृष्टीनें याच्या पुढची मजल आपल्या एकनाथांनीं गांठली. एकनाथ हे मेहतांपेक्षां जवळजवळ ३३ वर्षांनीं लहान होते. त्यांनीं मानव्यतेच्या दृष्टीनें केलेलें आचरण महाराष्ट्रीयांस अवगत असल्यामुळें त्या-विषयीं विशेष लिहिण्याचें कारण नाहीं. अस्पृश्यता-निवारण जरी त्यांनीं केलें नाहीं, तरी त्यांनीं कोणत्याहि विकल्पाशिवाय अस्पृश्य मुलीला उचलून तिचें सांत्वन केलेंच होतें. क्षुधितांना अन्न देण्याची लोकसेवा त्यांनीं चालू ठेविली होती. म्हणजे










अनुक्रमणिका

निष्कामकर्मीय मानव्यताप्रेरित गृहस्थी जीवन त्यांनीं साधलें होतें. अतएव एका परीनें ते भागवत धर्माचा कळस होत. वैदिक संस्कृतींत वर उल्लेखिलेल्या दोन आदर्शांपैकीं गृहस्थी जीवनाचा आदर्श त्यांनीं पराकाष्ठेस नेला होता. वैदिक संस्कृतीच्या विकासमार्गातील हा एक महत्त्वाचा टप्पा होय.

दुसऱ्या एका दृष्टीनें एकनाथ म्हणजे ज्ञानेश्वर, रामानंद व नरसिंह मेहता या तिघांचें कार्य एकत्रित करून पुढें चालविणारा एकमेव महान् पुरुष असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांनीं ज्ञानेश्वरांचें पंढरपूर येथील शुद्ध स्वरूपाचें विठ्ठल हें उपास्य दैवत कायम ठेवून, बालकृष्णाच्या लीला व बालचरित्र यांच्यावर भाविक अभंग लिहून, राधाकृष्णाला डावलून हरिनामाचा गजर केला आहे. तसेंच, रामचरित्र आळवून रामनाममहिमा गाइला आहे. रामोपासना व राममंदिरें हीं आपल्याकडे केव्हां आलीं हें सांगतां येणें कठिण आहे. नामदेवाच्या अभंगांत रामनाममहिमा व रामोपासना थोड्याफार प्रमाणांत आहे. ज्ञानेश्वरांच्या अभंगांत ती फारच अल्प प्रमाणांत दिसते. नंतरच्या काळाकडे दृष्टि फेंकल्यास असें दिसून येईल कीं, आपल्या महाराष्ट्रांत रामाचें देऊळ बहुतेक प्रत्येक शहरीं असतेंच. साधारणरीत्या तें विठोबाच्या देवळानंतरचें असतें. वैष्णव देवळें म्हणजे जास्त करून विठोबा व राम यांचीं. कृष्णाचीं जीं कांहीं मंदिरें आहेत तीं बहुतेक मुरलीधराचीं असतात. शोधाअंतीं असें आढळून येईल कीं, उत्तर प्रदेशाच्या पूर्व भागाच्या खालोखाल रामाच्या मंदिराचा व उपासनेचा प्रचार आपल्या महाराष्ट्रांतच आहे व याचें बरेचसें श्रेय रामदासांकडे जातें. महाराष्ट्रसंस्कृतीचा हा एक विशेष होय.

### दत्तोपासना : महाराष्ट्रसंस्कृतीचा विशेष

उपास्य दैवतांचा विचार करतांना दत्तोपासनेविषयीं थोडें तरी लिहिल्याशिवाय महाराष्ट्रापुरतें तरी विवेचन अगदींच अपुरें राहील. विष्णूच्या अवतारांच्या अनेक पौराणिक याद्यांपैकीं एकींत सनत्कुमार व नारद आणि दोहोंत दत्तात्रेय हे तीन नैष्ठिक ब्रह्मचारी अवतार म्हणून झळकतात. त्यांपैकीं दत्तात्रेय हेंच उपास्यदैवत म्हणून प्रचलित आहे. दत्तात्रेयाची मूर्ति उत्तर हिंदुस्थानांतील संन्याशांच्या आखाड्यांत असते व संन्यासी दत्तात्रेयास आपलें उपास्य दैवत समजतात. यापलिकडे दत्तोपासना किंवा दत्तमंदिर उत्तरेकडे दिसून येत नाहीं. गिरिनार पर्वतावर पादुका आहेत त्या दत्तात्रेयाच्या मानल्या जातात व त्या पादुका ज्या टेकडीवर आहेत त्या टेकडीस 'दत्तात्रेयाची टेकडी' असें म्हणतात. नर्मदेच्या दक्षिणेकडे आपल्या महाराष्ट्रांतच दत्तोपासना व दत्तमंदिरें आहेत. साधारणतः शहरांत दत्तमंदिर असतेंच. रामोपासनेपेक्षांहि दत्तोपासना महाराष्ट्रीय संस्कृतीचा एक विशेष आहे. हें वैशिष्ट्य केव्हां व कसें रूढ झालें हें नीटसें कळलेलें नाहीं. मूर्तिपूजा नसलेल्या महानुभावपंथीयांच्या मतें पंथसंस्थापक चक्रधर यांनीं एकमुखी व चतुर्भुजी दत्तात्रेयाची उपासना सांगितली आहे. हें त्यांचें मत ग्राह्य धरल्यास व तें सत्य असल्यास इ. स. १२७० च्या आसपास महाराष्ट्रांत दत्तोपासनेचा पुरावा मिळतो. दत्तात्रेयाच्या सर्वतोमुखीं असलेल्या ध्यानांत दत्त हा त्रिमुखी व षड्भुजी वर्णिलेला आहे व मंदिरांतून दिसणाऱ्या मूर्तीहि तशाच असतात. महानुभाव-पंथ सोडून दिल्यास दत्तोपासनेचा आद्य संबंध महाराष्ट्रांत नृसिंहसरस्वती या दसनामी संन्याशाकडे जातो. काशीहून संन्यास घेऊन आल्यावर या संन्याश्यानें कृष्णातीरीं शिरोळ किंवा औदुंबर या गांवीं वास करून महाराष्ट्रांत दत्तसंप्रदायाचा प्रसार केला. यांचा समाधिकाल इ. स. १४५८ मानतात. हे समाधिस्थ झाल्यानंतर ५० वर्षांनीं जन्मलेले जनार्दनस्वामी हे यांचे शिष्य समजले जातात. हेच जनार्दनस्वामी एकनाथांचे गुरु. यांच्या अभंगांत दत्ताचा सद्गुरु म्हणून उल्लेख असून, दत्ताच्या औदुंबरवासाचाहि उल्लेख आहे. यांचें वर्णन षड्भुजी मूर्तीचेंच आहे. एकनाथांनीं सद्गुरुमहिम्यांत दत्तगुरूंना बरेंच महत्त्व दिलें असून, गुरुपरंपरेंत आपल्या गुरूचें म्हणजे जनार्दनस्वामींचे गुरु दत्त होते असें म्हटलें आहे. येथपासूनच पुढें दत्तसंप्रदाय महाराष्ट्रांत फोंफावला व तो महाराष्ट्रीय संस्कृतीचा एक विशेष बनला. म्हणजे महाराष्ट्रानें कृष्णाला बालकृष्ण किंवा मुरलीधर याच रूपांत

ठेवून राधा-कृष्णाऐवजीं विठोबा-रखुमाईला पुढें आणून व रामसीतेच्या उपासनेची जोड देऊन-सुद्धां संगत्यागवृत्तीची परिपूर्ति होत नाहीं असें जाणून, पूर्ण संन्यासी असें एक आणखी दैवत त्यांच्या जोडीला आणून बसविलें. म्हणूनच हें महाराष्ट्रीय संस्कृतीचें एक वैशिष्ट्य ठरतें.

## संन्याश्यांच्या संघटना

वैदिक संस्कृतीचा दुसरा जीवनादर्श म्हणजे नैष्ठिक ब्रह्मचर्य होय. नैष्ठिक ब्रह्मचर्य म्हणतांच आधुनिक विद्येच्या चष्म्यांतून जीवनाचा विचार करणाऱ्यांना निवृत्तिपर अतएव त्याज्य मार्गाची जाणीव होते व ते तिकडे कानाडोळा करतात. परंतु वैदिक संस्कृतीच्या विकासांत अत्यंत प्रामुख्यानें भाग घेणाऱ्या व्यक्तींत जवळजवळ ३००० वर्षांपूर्वीच्या सनत्कुमारांपासून तों परवांच्या स्वामी विवेकानंदांपर्यंत दहावीस तरी व्यक्ती नैष्ठिक ब्रह्मचारी होत्या. संन्यस्त आदर्शानें, वैदिक संस्कृतीच्या विकासासाठीं आपला क्षुण्णमार्ग सोडून राजकीय धडामोडींत भाग घेण्याचें पहिलें श्रेय शंकराचार्यांच्या शृंगेरी येथील मुख्य मठाच्या अधिपतींकडेच जातें. चौदाव्या शतकाच्या जवळ-जवळ मध्यास विजयनगरच्या व तेथील संगम घराण्याच्या उदयाला शृंगेरी मठाधिपतींनीं बराच हातभार लावला व दोनतीन पिढ्यांपर्यंत तरी तेथील अधिपतीच त्या घराण्याचे राजगुरु राहिले. त्यांतील अत्यंत प्रसिद्ध म्हणजे माधव विद्यारण्य हे होत.

विद्यारण्यांनंतर, आपल्या महाराष्ट्रांतील रामदास दोनशें वर्षांनीं म्हणजे विजयनगरसाम्राज्याचा अस्त झाल्यानंतर जवळजवळ अर्ध्या शतकानें उदयास आले व त्यांनीं रामानंद व विद्यारण्य यांच्या पुढचें पाऊल टाकलें. त्यांनीं परिस्थिति जाणून वैदिक संस्कृतीचा बचाव करण्यासाठीं संन्यस्त लोकांना एका तऱ्हेच्या प्रवृत्तिमार्गानें जाण्यास लावण्याचा प्रयत्न केला. महाराष्ट्रांत अनेक ठिकाणीं मठ स्थापन करून तेथून त्यांच्या संन्यस्त शिष्यांनीं परकी संस्कृतीच्या आक्रमणाविरुद्ध संघटना करण्यास सुरुवात केली. मानव्यता व विश्वव्यापकता हीं तरी संस्कृति जगली तरच व्हावयाच्या ना ? तेव्हां संस्कृति जगविण्यासाठीं लोकसंघटना व लोकोपदेश हीं ध्येयें प्रथमच वैदिक संस्कृतींत आणून प्रस्थापित करणें म्हणजे तिचा विकासच होय. त्यांचा प्रयत्न फारसा यशस्वी झाला नाहीं, हें इतिहास सांगतो !

याच सुमाराला उत्तर हिंदुस्थानांत एक बंगाली संन्यासी काशीला येऊन राहिला होता. त्याचें नांव मधुसूदनसरस्वती. मधुसूदनसरस्वतींनीं शांकर वेदांतावर केलेलें सर्वमान्य लेखन विदितच आहे. पण त्यांनीं नाग्या किंवा लढवय्या संन्याशांची व्यवस्थित संघटना केली, हें संस्कृतीच्या अभ्यास-कांना फारसें माहीत नाहीं. रामानंदांनीं शूद्रांना वैष्णवी संन्यासाश्रमाचा मार्ग मोकळा केला. मधुसूदन-सरस्वतींनीं त्यांना दसनामी संन्याशांच्या संघटनेंत स्थान दिलें. वैदिक संस्कृतीवर होणाऱ्या प्राणांतिक आघातांचा प्रतिकार करण्यासाठीं मानव्यतेच्या मार्गानें झालेला हा वैदिक संस्कृतीचा विकासच होय. इस्लामी तडाख्यांनीं जर्जर होत असतां उत्तर हिंदुस्थानांतील संन्यासी व बैरागी यांनीं संस्कृतिसंरक्षणाची कळकळ आपल्या संसारी अनु-यायांपेक्षांहि कांकणभर जास्त दाखविली असें म्हणा-वयास हरकत नाहीं. मधुसूदनसरस्वती समाधिस्थ झाल्यानंतर जवळजवळ १५० वर्षांनीं वैष्णव बैराग्यांनीं आपल्या लढवय्या नाग्यांची पद्धतशीर संघटना केली. यापूर्वींच मधुसूदनसरस्वतींच्या संन्यासी संघटनेचीं फळें दिसून आलीं होतीं. कारण औरंगजेबाच्या कारकीर्दींत संन्याशांनीं एकदां तरी औरंगजेबाच्या सैन्याशीं लढून काशीचें संरक्षण केलें होतें. याच सुमारास एक विलक्षण बैरागी सौराष्ट्रांत उद्भवला. त्यानें आपला स्वतंत्र पंथ स्थापन केला व स्वतः जातीनिशीं छत्रसाल बुंदेल्याच्या घोड्याला घोडा लावून रणांगणावरसुद्धां उभा राहिला. तो म्हणजे प्राणनाथ होय. ह्याच सुमारास वैष्णव बैराग्यांची संघटना झाली. त्यांनीं आपल्या संघटनेनंतर २५–३० वर्षांतच अहमदशहा अबदालीच्या दुराणी तुकडीला धैर्यानें तोंड देऊन गोकुळ बांचविल्याचें रियासतकार सरदेसाई यांनीं नमूद केलेलेंच आहे.

अंतःशुद्धीचे प्रयत्न चाललेच होते. त्यांतील एक म्हणजे सहजानंदांचा स्वामिनारायण-पंथस्थापनेचा होय. याचा काल सुमारें इ. स. १८०० हा होय.











# वैदिक संस्कृतींतील धर्मकल्पनांचा विकास

## विवेकानंद, रवींद्रनाथ, राधाकृष्णन्

येथून आपण आपल्या निकट परिचयाच्या कालांत शिरतों. प्रथमतः असें दिसून येतें कीं, एकीकडे राममोहन रॉय हे ख्रिस्ती धर्माच्या शिकवणीनें खडबडून जागे होऊन धर्मसुधारणेसाठीं ब्राह्मसमाज स्थापून निघून गेले. तर दुसरीकडे वैदिक संस्कृतींतच मुरलेला गदाधर चतर्जी नांवाचा हिरा चमकला. गदाधर चतर्जी हें रामकृष्ण परमहंसांचें पूर्वाश्रमींचें नांव. रामकृष्णांनीं आपल्या उन्मनी स्थितीच्या प्रभावानें अनेक उन्मार्गी तरुणांना, सुशिक्षितांना व विचारवंतांनाहि वैदिक संस्कृतीच्या परिशीलनाकडे वळविलें. त्यांतील सर्वांत तेजस्वी व्यक्ति म्हणजे नरेंद्रनाथ दत्त हा होय. हेच आपले स्वामी विवेकानंद. यांनीं परदेशीं जाऊन आपल्या तेजस्वी चेहऱ्यानें व ओजस्वी वाणीनें, अमेरिका व इंग्लंड येथील विचारवंत लोकांत वैदिक संस्कृती-विषयीं व तिचा जिवंत आदर्श म्हणून रामकृष्ण परमहंसांविषयीं बराच आदर निर्माण केला. सिस्टर निवेदिता व दुसरा कांहीं गौरवर्णीय शिष्यसंप्रदायहि ते मिळवून आले. वैदिक संस्कृतीच्या विश्वव्यापक-तेची लायकी दाखविणारा हाच पहिला नमुना होय. विवेकानंदांनीं संन्याससंघटनेच्या मार्गावर पुढचें पाऊल टाकलें, म्हणजे रामकृष्ण मिशनची स्थापना केली. आद्यशंकराचार्य व रामानंद यांच्यानंतर वैदिक धर्मकल्पनांच्या विकासांत यांच्या मिशन आश्रमानें एक मोठीच प्रगति केली आहे. अन्नदान ही लोकसेवा समाजांत मान्यता पावलेलीच होती. पण भारतभर पसरलेल्या आश्रमांनीं रुग्णांना औषधोपचार करून व प्रसंगीं त्यांची शुश्रूषा करून आणि आर्तांची हांक ऐकून त्यांच्या मदतीला धांवून जाऊन वैदिक संस्कृतीची अभिजात मानव्यता ठणठणितपणें प्रत्ययास आणून दिली आहे.

रवीन्द्रनाथ ठाकूर ( टागोर ) हे नुसते ब्राह्म-समाजाचेच कळस नसून वैदिक संस्कृतीच्या कळ-सांतले एक आहेत हें नमूद केलें म्हणजे त्यांनीं विवेकानंदांच्या पुढचें पाऊल टाकलें हें लक्षांत येईल. ठाकुरांनीं आपल्या इंग्रजींतील ' साधना ' या ग्रंथाच्या द्वारें उपनिषदीय तत्त्वज्ञानाच्या जिवंत झऱ्याचें पाणी जगांतील विचारवंतांना त्यांच्या संवयीच्या प्रणालींतून चाखावयास दिलें. स्वतः थोडेसे तृप्त होत्सात्या विचारवंतांनींहि बाकीच्यांना त्याची तृषा उत्पन्न केली. ही तृषा थोडी-फार शम-विण्याचें महत्-कार्य सर्वपल्ली राधाकृष्णन् यांनीं केलें. या सरस्वतीजिव्हाग्राच्या वाक्चापल्यानें व भाषा-सौष्ठवानें मुग्ध झालेल्या पाश्चात्त्य विचारवंतांत वैदिक संस्कृतीविषयीं आदर व जिज्ञासा उत्पन्न झालेली आहे. अतएव वैदिक संस्कृतीच्या अलिकडच्या विकासांत विवेकानंद, रवीन्द्रनाथ व राधाकृष्णन् या त्रयीचें स्थान त्रिमूर्तिवत् आहे.

असो. उपरिनिर्दिष्ट मतभेदांतील माझीं सर्वच मतें जरी खरीं ठरलीं तरी तर्कतीर्थांच्या ग्रंथाची किंमत कमी होत नाहीं. हा ग्रंथ वाचनीय आहे तसाच मननीय पण आहे.

---

**सेंटर कोठें : दिल्लींत कीं खेड्यांत**—अंतर्गत बंडाळी आणि बाहेरील आक्रमण यांवर उपाय म्हणून आपण सरकारें बनवतों, आणि त्या सरकारांना अलिकडे लोकजीवनाचें सर्व बाजूंनीं नियंत्रण करण्याची सत्ता सोंपवितों. पूर्वी असें करीत नव्हतों. पूर्वीचीं सरकारें मुख्यतः संरक्षक मानलीं जात होतीं. अलीकडचीं सरकारें ' कल्याण-राज्यें ' म्हणतात. आर्थिक, सामाजिक इत्यादि अनेक ' इकें ' नीट जमल्याशिवाय शांति नांदणें शक्य नाहीं, असा निष्कर्ष अलीकडे निघाला आहे. अशा रीतीनें जो पुरभय्या म्हणून ठेवला होता तो आतां परमेश्वर बनल्यासारखा झाला आहे. आपलें सर्वस्व त्याला समर्पण करावें, अशी आत्यंतिक भक्तीची भाषा राजकारणांतील कोविद रूढ करीत आहेत. ' सेंटर मजबूत ' हा आजकालचा उद्घोष आहे. ' सेंटर ' कोठें आहे या विषयींच काय तो गैरसमज आहे. सेंटर : दिल्ली कीं देहात, हा सवाल अजून सुटलेला नाहीं. विविध विचारांचे वाद घालून राजकारणाचा केवळ चुथडा चालू आहे. सबंध देश एकाच सत्तेखालीं आल्याचा आनंद मात्र आहे. ' ओनामा ' चालू आहे. ' सिद्धम् ' पर्यंत अजून पोंचलोंच नाहीं.

—आचार्य विनोबा ( ' सेवक ' वरून )








प्रा. दिनेश द. माहुलकर

# ॲरिस्टॉटल्‌विरुद्ध मोहीम

'काय ही आपली प्रगति कीं, आजच्या विसाव्या शतकांतदेखील आपण प्लेटो आणि ॲरिस्टॉटल् यांच्या छायेंत वावरत आहोंत!' असे उद्‌गार एकदां शॉनें काढले होते. शॉच्याहिपुढें जाऊन रसेल अगदीं त्वेषानें म्हणतो कीं, 'ॲरिस्टॉटल्‌चा जन्म हें साऱ्या मानवजातीचें दुर्भाग्य होय. आजच्या विद्यापीठांतून शिकविल्या जाणाऱ्या तर्कशास्त्रांतील मूर्खपणाला तोच जबाबदार आहे'— ('The Scientific Outlook', पान ६३). पंधरा वर्षांपूर्वी काढलेले हे उद्गार रसेल आजीहि विसरला नाहीं. गेल्या महायुद्धाच्या काळांत लिहिलेल्या आपल्या 'History of Western Philosophy' (1946) या ग्रंथांत ॲरिस्टॉटल् व त्याचें तर्कशास्त्र यांच्याविरुद्ध रसेल लिहितो : 'अजूनहि तत्त्वज्ञान शिकविणारे कॅथलिक गुरू व इतर कित्येक पंडित आधुनिक तर्कशास्त्राच्या नव्या शोधांना हेटाळून टोलेमीच्या खगोलशास्त्राइतक्या जुनाट झालेल्या ॲरिस्टॉटल्‌च्या तर्कशास्त्राला हट्टानें चिकटून बसतात...हल्लींच्या तत्त्वज्ञानांत ॲरिस्टॉटल्‌चें स्थान हें शुद्ध विचाराला अगदीं विघातक आहे...आधुनिक काळांत जर एखाद्याला तर्कशास्त्र शिकण्याची इच्छा होऊन त्यानें ॲरिस्टॉटल् व त्याचे शिष्य यांचे ग्रंथ वाचण्यास सुरुवात केली, तर त्याचा वेळ व्यर्थ गेला असें समजावें.' (पा. २१८, २२५)

रसेल म्हणतो त्याप्रमाणें युरोपांतील कॅथलिक तत्त्वज्ञांनीं ॲरिस्टॉटल्‌ला अद्यापहि उराशीं बाळगला असेल तर त्यांत फारसें आश्चर्य नाहीं. कारण, कॅथलिक धर्माला मध्ययुगीन काळांत जें तात्त्विक अधिष्ठान मिळालें तें ॲरिस्टॉटल्‌च्या तत्त्वज्ञानाचें होतें. पण आमचा वारसा ग्रीक तत्त्वज्ञानाचा नाहीं व आमचा पंथहि कॅथलिक नाहीं. तथापि, इंग्रजी शिक्षणपद्धतीमुळें आमच्या विद्यापीठांतील अभ्यास-क्रमांत शिरलेल्या ॲरिस्टॉटल्‌च्या तर्कशास्त्राविरुद्ध कोणी अजूनहि ब्र काढूं नये, हें आश्चर्य होय!

## तत्त्वज्ञानांत धर्म-नीति-प्रश्नांचें प्राबल्य

ॲरिस्टॉट्‌लविरोधी मोहीम आजच्या काळांतच उभारली गेली आहे असें नव्हे. मध्ययुगीन काळांत त्याच्यावर खडसून टीका करणारे अनेक तत्त्वज्ञ होऊन गेले. परंतु कॅथलिक धर्मानें मध्य-युगीन काळापासून तत्त्वज्ञानाला जें स्वतःच्या (ancilla theologiae) दासीचें कार्य दिलें होतें, त्यांतून त्याची पूर्णपणें सुटका होईपर्यंत ॲरिस्टॉटल्‌चें उच्चाटन होणें शक्य नव्हतें. विल्यम ऑफ ऑकहॅम्, बेकन्, गॅलिलिओ यांनीं ॲरिस्टॉटल्‌च्या विचारसरणीस ढासळून पाडलें, तरी तत्त्वज्ञांच्या मना-वरील धर्माचें दडपण जोंपर्यंत कायम होतें तोंपर्यंत या मोहिमेला यश मिळणें शक्य नव्हतें. अजूनहि धर्माच्या व नीतीच्या प्रश्नांचेंच प्राबल्य तत्त्वज्ञानांत अधिक आहे. ज्यांना तत्त्वज्ञानाला या प्रश्नापुरतें मर्यादित ठेवायचें आहे त्यांनीं तें खुशाल ठेवावें; परंतु गॅलिलिओच्या काळापासून आजतागायत जी वैज्ञानिक प्रगति झाली आहे, त्या प्रगतींत मानवानें जें ज्ञान आत्मसात् केलें आहे, तें ज्ञान देखील तत्त्वज्ञान बनण्याला पात्र आहे, असें म्हणणारे कांहीं विचार-वंत आधुनिक काळांत आहेत. त्यांत रसेल अगदीं प्रमुख आहे. त्यानें आपलें मत योग्य शब्दांत पुढीलप्रमाणें मांडलें आहे. तो म्हणतो :










" नैतिक विचारांनीं स्फुरलेल्या तत्त्वज्ञानाचें महत्त्व अथवा मूल्य त्या तत्त्वज्ञानाच्या स्वतंत्र क्षेत्रांत पुष्कळ आहे हें मी कबूल करतों. उदाहरणार्थ, स्पिनोझाचें नीतिमूल्यविषयक तत्त्वज्ञान माझ्या दृष्टीनें श्रेष्ठ दर्जाचें आहे; पण अशा तत्त्वज्ञानांत बाह्य जगतांच्या स्वरूपासंबंधींचे तात्त्विक विचार महत्त्वाचे नसतात किंवा बुद्धीनें सिद्ध करतां येईल अथवा नाकारतां येईल असेंदेखील त्यांत कांहीं नसतें. जीवन व बाह्य जग यांच्याविषयीं नवनव्या भावना निर्माण करण्याचा मार्ग त्यांत अभिप्रेत असतो, हेंच त्याचें महत्त्व आहे. असल्या भावनात्मक मार्गानेंच आपण आपल्या स्वतःच्या अस्तित्वाला आदर्श लक्षणांनीं विभूषित करूं शकतों. असल्या तत्त्वज्ञानाचें मूल्य कितीहि श्रेष्ठ असलें तरी तें मूल्य व्यवहाराशीं निगडित आहे, तात्त्विकतेशीं नाहीं. वैज्ञानिक तत्त्वज्ञानाचें ध्येय केवळ बाह्य जगताचें ज्ञान करून घेण्याचें आहे, जीवनाला भावनेनें उजळा देण्याचें नाहीं. यामुळें हें तत्त्वज्ञान नैतिक विचारांचा परामर्श घेऊं शकत नाहीं. तें जर नीतिमूल्यांचा विचार लक्षांत घेऊं लागलें तर वैज्ञानिक भूमिकेला अवश्य असा सत्यानुगामित्वाचा मूलभूत मार्ग त्याला सोडावा लागेल. "[1]

## दोन भिन्न शाखांची गल्लत

रसेलच्या वरील विचारांवरून तत्त्वज्ञानाच्या दोन अगदीं विभक्त शाखा मानणें अत्यंत अवश्य आहे हें कोणासहि पटेल. पण रसेल म्हणतो म्हणून तत्त्वज्ञानाच्या या दोन शाखा मानावयाच्या, असें नाहीं. प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञानाच्या इतिहासाकडे पाहिलें तर 'वैज्ञानिक' व 'नैतिक' अशा दोन निरनिराळ्या तत्त्वज्ञान-शाखा अस्तित्वांत असलेल्या आढळतात. यांपैकीं पहिली शाखा अधिक प्राचीन आहे. तिची सुरुवात थेल्स (Thales : 624 B. C.–548 B. C.) यानें केली व डेमॉक्रिटस् (Democritus : 460 B. C.–370 B. C.) हा या शाखेचा शेवटचा तत्त्वज्ञ मानला जातो. दुसऱ्या शाखेची सुरुवात सॉक्रेटिसानें (469B. C.–399B. C.) केली. प्लेटो व ॲरिस्टॉटल् यांनीं या दोन शाखा एकत्र आणण्याचा प्रयत्न केला व तेव्हांपासून या दोन विभक्त तात्त्विक दृष्टिकोनांची गल्लत करण्याची प्रथा रूढ झाली. साऱ्या मध्ययुगीन तत्त्वज्ञानाचा इतिहास म्हणजे तत्कालीन तत्त्वज्ञांनीं आपल्याला पटलेल्या धार्मिक व नैतिक तत्त्वांच्या कळसाखालीं बुद्धीचा पाया रचण्यासाठीं केलेला व्यर्थ खटाटोप होता. अजूनहि विद्यापीठांतून शिकविलें जाणारें तत्त्वज्ञान हें या मध्ययुगीन छापाचें आहे.

नैतिक तत्त्वज्ञानाचा उपयोग रसेलनें म्हटल्या-

---

१ 'I do not deny the importance or value, within its own sphere, of the kind of philosophy which is inspired by ethical notions. The ethical work of Spinoza, for example, appears to me of the very highest significance, but what is valuable in such work is not any metaphysical theory as to the nature of the world to which it may give rise, nor indeed anything which can be proved or disproved by argument. What is valuable is the indication of some new way of feeling towards life and the world, some way of feeling by which our own existence can acquire more of the characteristics which we must deeply desire. The value of such work, however immeasurable it is, belongs with practice, and not with theory... The scientific philosophy, therefore, which aims only at understanding the world and not directly at any other improvement of human life, can not take account of ethical notions, without being turned aside from that submission to fact, which is the essence of the scientific temper.'

—'Mysticism and Logic', p. 109.

प्रमाणें जीवनासंबंधीं नवनव्या भावना निर्माण करण्याचा असेल, तर कला व वाङ्मय यांच्या बरोबरीनें त्यांच्यांत जीवनाची परिणति साधणारी कर्मनिष्ठा निर्माण व्हावयाला पाहिजे. तशी कर्मनिष्ठा निर्माण होण्यास तें तत्त्वज्ञान सामाजिक, आर्थिक, धार्मिक व राजकीय संस्थांशीं कसें संबद्ध आहे हें दाखवावें लागणार. जुन्या तत्त्वज्ञानाचा अशा प्रकारचा अभ्यास करावयाचा म्हटला तर तो एक व्यापक समाजशास्त्राचें अंग म्हणूनच करावा लागेल. पण तत्त्वज्ञानाला असलें दुय्यम स्थान देण्यास आधुनिक तत्त्वज्ञ तयार नाहींत. धार्मिक व नैतिक प्रश्न हे सामाजिक, आर्थिक व राजकीय प्रश्नांशीं सापेक्ष आहेत हें त्यांना अद्याप पटत नाहीं. यामुळें आधुनिक विचार-क्षेत्रांत एकीकडे 'निराशावादी नीतिवाद' शिकविणारें अस्तित्ववादाचें तत्त्वज्ञान, तर दुसरीकडे 'नीतिमय क्रांतिवाद' शिकविणारें साम्यवादाचें तत्त्वज्ञान असले दोन ध्रुव निर्माण झाले आहेत.

## जुनें तर्कशास्त्र हें थोतांड

नीतिमूल्यविषयक प्रश्न वगळले तर दुसरे असे कांहीं प्रश्न आहेत कीं, त्यांचें विवेचन करावयाचें म्हटलें तर, समाजशास्त्रीय दृष्टिकोनाऐवजीं निराळी तात्त्विक भूमिका स्वीकारावी लागते. उदाहरणार्थ, संख्या-बिंदु यांसारखे गणिती प्रश्न, स्थळ-काळ यांसारखे वैज्ञानिक प्रश्न किंवा शब्द-अर्थ यांसारखे भाषिक प्रश्न विचारांत घेतले तर ते ज्या भूमिकेवरून स्पष्टपणें कळतील अशी भूमिका म्हणजे तत्त्वज्ञान होय, अशी थेल्सपासून डेमॉक्रिटस्पर्यंतच्या तत्त्वज्ञांची तत्त्वज्ञानासंबंधीं कल्पना होती. या तात्त्विक भूमिकेमध्ये गूढ असणाऱ्या बुद्धितत्त्वाला हेराक्लिटस्नें Logos असें संबोधिलें. ॲरिस्टॉटल्नें असल्या तत्त्वाचा स्वतंत्रपणें विचार करणाऱ्या ज्ञानविभागा-(Deductive Logic) ची रचना केली व बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत या तर्कशास्त्राचा युरोपांतील शिक्षणांत समावेश झाला.

ॲरिस्टॉटल्विरुद्ध मध्ययुगीन काळांत मोहीम उभारणारा पहिला तत्त्वज्ञ विल्यम् ऑफ ऑक्हॅम् (William of Occam : 1280-1347) होय. ऑक्हॅमनें सुरू केलेल्या Inductive Logic च्या विचारसरणीची परिणति बेकननें रचलेल्या नव्या तर्कशास्त्रांत ('Novum Organum', 1620) झाली. या विचारसरणीवर १९ व्या शतकांत मिल्, व्हेवेल वगैरेंनीं शिक्कामोर्तब करून दोन्ही तर्कशास्त्रांची कशी तरी सांगड घातली. आजच्या विद्यापीठांतून शिकविल्या जाणाऱ्या तर्कशास्त्राचें स्वरूप हेंच आहे.

या जुन्या तर्कशास्त्राविरुद्ध युरोपांत आतां एक नवी मोहीम सुरू झाली आहे. गेल्या शतकभरांत जी गणितशास्त्राची प्रगति झाली आहे, तिनें जुनें तर्कशास्त्र हें शुद्ध थोतांड आहे असें सिद्ध केलें आहे. मध्ययुगीन काळापासून 'तर्कशास्त्र हें साऱ्या शास्त्रांचें शास्त्र आहे' अशी ज्याची महती गायिली गेली तें ॲरिस्टॉटल्प्रणीत तर्कशास्त्र अगदीं प्राथमिक अवस्थेच्या गणितावर आधारलेलें आहे, असें आधुनिक गणितज्ञांनीं सिद्ध केलें आहे.[२] असल्या विचारसरणीची सुरुवात जॉर्ज् बूल (Boole : 1815-94) या इंग्रज गणितज्ञाच्या 'An Investigation of the Laws of Thought' (1854) या ग्रंथानें झाली व पिआनो (Peano), फ्रेगे (Frege) वगैरेंच्या विचारांचा मागोवा घेत, रसेल व व्हाइटहेड यांनीं जुन्या तर्कशास्त्राला टाळून एका नव्या गणिती तर्कशास्त्राची रचना आपल्या Principia Mathematica (1910-13) च्या तीन विशाल ग्रंथांत केली.

## विज्ञान, गणित आणि तत्त्वज्ञान हीं जवळजवळ येत आहेत

गणितामधील मूलभूत तार्किक रचना शोधणाऱ्या या विचारप्रणालीला गणितशास्त्रांत Formalism असें नांव आहे. ही विचारप्रणाली

---

२ 'All Aristotelian syllogistic arguments may be carried out in terms of Boolean Algebra.' —'Survey of Modern Algebra':

Birkhoff and MacLane, p. 324.

युरोपांत फारशी प्रसिद्धि पावली नाहीं. गणिताला तार्किक रचनांमध्यें गुंतवून केवळ तर्काचे देव्हारे सजले, पण विज्ञानाला मार्गदर्शन करण्याचें गणिताचें खरें कार्य त्यामुळें अडकून राहिलें, असा या मतप्रणालीवर आरोप आला. विज्ञानाच्या क्षेत्रांतील नवे शोधहि जणुं या मतप्रणालीच्या सिद्धान्तावर उठले ! आइन्स्टाइन्‌च्या सापेक्षता-सिद्धान्तानें विश्वाचें मर्यादित्व सिद्ध केलें व प्लँकच्या अणु-सिद्धान्तानें शक्ति ( Energy ) ही अमर्यादितपणें विभागली जाणें शक्य नाहीं, हें प्रगट केलें. यामुळें गणिती सिद्धान्तांच्या तार्किक विश्लेषणापेक्षां त्या सिद्धान्तांचा विज्ञानाला कसा उपयोग करून घेतां येईल याकडे गणितज्ञांचें लक्ष गेलें. याचा परिणाम असा झाला कीं, गणिताला तर्कशास्त्राचें खूड आहे असें जें मत आतांपर्यंत मांडण्यांत आलें होतें त्यावरून गणितज्ञांची श्रद्धा पार उडाली.[३]

१९२७ सालीं रसेलनें देखील असे उद्गार काढले कीं, पदार्थविज्ञानाचा एक भाग म्हणून भूमितीचा अभ्यास झाला, तरच भूमिति महत्त्वाची ठरेल. याचा अर्थ असा होतो कीं, गणित किंवा तर्कशास्त्र यांना ज्या अनुभवातीत ( a priori ) म्हटल्या जाणाऱ्या तत्त्वांचा आधार आहे, तो केवळ प्रत्यक्ष अनुभवाला प्रगट करण्यासाठीं मानवाजवळ जीं ज्ञानतत्त्वें ( Epistemological Principles ) आहेत त्यांचा आहे. या तत्त्वांचा अभ्यास हाच विज्ञान व गणित यांच्या अभ्यासाचा पाया आहे. या दृष्टिकोनामुळें तात्त्वज्ञानिक क्षेत्रांत एका नव्या मनूची सुरुवात झाली आहे. विज्ञान, गणित व तत्त्वज्ञान यांना जवळजवळ आणण्याचा जो उपक्रम गेल्या कित्येक शतकांपासून चालू आहे तो आतां यशस्वी झाला आहे. ॲरिस्टॉटल्‌च्या तर्कशास्त्रा-विरुद्ध मध्ययुगीन काळांत सुरू झालेली मोहीम हा या उपक्रमाचा ओनामा होता व गॅलिलिओनें मांडलेलें महत्त्वाचें वैज्ञानिक तत्त्व—जें मापनीय आहे त्याचें मापन करणें व जें अजून मापनीय नाहीं तें मापनीय करणें (' to measure what is measurable and to try to render measurable what is not so as yet ')' ही या उपक्रमाची पहिली क्रांतिकारक घटना होती. आजची वैज्ञानिक तत्त्वज्ञानाची रचना म्हणजे ॲरिस्टॉटल् व त्याचे भक्त यांच्या कचाट्यांतून सुटलेल्या सिन्डरेलाचा सुखी संसार होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

३ हिल्बर्ट हा गणितज्ञ लिहितो : ' Mathematics possesses a content that is secure independently of all logic and, therefore, can never be based upon logic alone. '--( Uber das Unendliche, p. 171. )

---

**पाश्चात्त्यांचीं वैशिष्ट्यें**—मुंबई विधिमंडळाचे सभापति श्री. द. का. कुंटे हे नुकतेच कॅनडा व युरोपच्या दौऱ्यावरून परत आले. पाश्चात्यांच्या जीवनाचीं केलेलीं कांहीं निरीक्षणें त्यांनीं एका मुलाखतींत सांगितलीं. त्यापैकीं पुढील भाग उद्धृत केला आहे : " समता व कष्टप्रियता ही साऱ्या पाश्चात्त्यांचीं वैशिष्ट्यें होत. कानडांत व युरोपांत उच्चनीचतेची भावना अगदीं आढळत नाहीं. अधिकाऱ्यांचीं मुलें तरुण वयांत सडकेवर खडी टाकण्यासारखीं हलकीं कामें करण्यांत सुट्या घालवितात. कानडांत एक महाराष्ट्रीय कुटुंब भेटलें. मी त्यांच्या घरीं जेवायलाहि गेलों होतों. ' येथें काम फार ' अशी त्या गृहिणीनें तक्रार केली. याचें कारण तेथें घरगडी नाहीं. मोठ्या अधिकाऱ्यांनाहि घरकामांतून सुटका नाहीं. कांहीं पाकिस्तानी विद्यार्थी एका मोठ्या अधिकाऱ्याला भेटायला गेले. तेथें त्याची बायको मोलकरणीसारखी राबत होती. नवरा तळघरांत काम करीत आहे असें तिनें सांगितल्यावर ते तळघरांत गेले. तेथें खरेंच तो कांहीं तरी दुरुस्तीचें बांधकाम करीत होता व ' हात धुतल्यावर मी भेटेन ' असें सांगून त्यांना त्यानें काम संपेपर्यंत खोळंबून ठेवलें. संडास धुण्यापासून बाग लावण्यापर्यंत सर्व कामें घरच्या स्त्रीपुरुषांना करावीं लागतात. गडी हवा तर रोज आपल्या हिशेबानें ३० रुपये मजुरी दिली पाहिजे इतकी मजुरी महाग आहे. "

—' लोकमान्य ' ( मुंबई ) ( १२-११-५२ )

प्रा. राजा पाटणकर

# पुन्हां एकदां 'एकच प्याला'

## प्रा. क्षीरसागरांचें ऋण

गडकऱ्यांच्या 'एकच प्याला' या लोकप्रिय नाटकावर आज कोणतेहि वेगळे विचार एखाद्या नव्या लेखकानें मांडणें हें धाष्ट्यांचेंच आहे. १९१९ पासून आजपावेतों ही लोकप्रिय कलाकृति अनेक माननीय टीकाकारांचा लक्ष्य-विषय होऊन बसलेली आहे. श्री. खांडेकरादि जुन्या व प्रा. वाळिंबे यांच्यासारख्या नव्या टीकाकारांनीं या कलाकृती-कडे सामाजिक विषयावरील एक प्रमेयप्रधान नाटक या दृष्टीनें पाहून, त्या अनुरोधानें त्यांतील गुणदोषांची चिकित्सा केली आहे. त्यांनीं व्यक्ति-चित्रणाकडे पूर्णपणें दुर्लक्ष केलेलें नसलें, तरी त्यांच्या टीकेचा कल तिकडे नव्हता, हें निश्चित. या दृष्टिकोनांतून बऱ्याच अंशानें सदोष ठरणाऱ्या या नाटकाला मराठी वाङ्मयांत मानाचें स्थान कां प्राप्त झालें, याचा उलगडा मात्र ते नीटपणानें करूं शकले नाहींत. परंतु पांच-सहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या प्रा. क्षीरसागरांच्या 'एकच प्याला'वरील प्रबंधानें गडकरी-टीकापरंपरेंत मूलभूत व मौलिक बदल घडवून आणला. हा प्रबंध या विशिष्ट टीकापरंपरेंत युगप्रवर्तक म्हणून इतका महत्त्वाचा आहे कीं, गडकऱ्यांवरील टीकाकारांचे क्षीरसागरपूर्व व क्षीरसागरोत्तर असे दोन गुण-वाचक वर्ग पडूं शकतील. प्रा. क्षीरसागरांनीं या निमित्तानें जीं नवीं टीकामूल्यें मराठी टीकेला दिलीं, त्यामुळेंच त्यांना हें मानाचें स्थान प्राप्त झालेलें आहे. त्यांनींच प्रथम वाङ्मयांतील सामा-जिक, सुधारकी व बुद्धिवादी दृष्टिकोनांचा कटाक्षानें त्याग केला. ट्रॅजिडीच्या चिकित्सेंत सामाजिक प्रश्न, तात्त्विक बैठक, मूलतः बुद्धिवादावर आधारलेली प्रमेयाची उकल या बाबी गौण असून, त्यांतील महत्त्वाच्या व्यक्तित्वाची घडण कशी होते याचा शोध घेणें हें अत्यावश्यक आहे, ही गोष्ट प्रथम त्यांनीं प्रतिपादिली. आणि एका अर्थानें, येथ-पावेतों जुन्याच चक्रांत रंगण घालणाऱ्या मराठी नाट्यटीकेला त्यांनीं ब्रॅड्लेपर्यंत नेऊन पोहोंचविलें. या जगद्वंद्य आंग्ल टीकाकाराच्या पद्धतीनेंच क्षीरसागरांनीं सुधाकराच्या मनाचा मागोवा घेतला आहे. तसेंच, त्यांनीं निरंकुश ('रोमँटिक' या संज्ञेंत अभिप्रेत असलेल्या अनेक अर्थांपैकीं एक अर्थ) नाट्यतंत्राचाहि महत्त्वपूर्ण असा पुरस्कार केलेला आहे. क्षीरसागरांचे निष्कर्ष विवाद्य असतील; परंतु त्यांनीं दिलेली नवी दृष्टि अनन्यसाधारण आहे हें खास. प्रस्तुत लेखांत त्यांचा उल्लेख वारंवार येणार आहे याचें कारण इतकेंच कीं, त्यांच्यानंतर गडकऱ्यांवर लिहिणाऱ्या कोणत्याहि टीकाकारास त्यांचें ऋण जमेस धरूनच लिहावें लागावें इतकें त्यांच्या प्रबंधाचें महत्त्व आहे.

क्षीरसागरांच्या विवेचनावर आणि विचारसरणी-वर ब्रॅड्लेची फार खोलवर छाप पडली आहे. तथापि त्यांच्या विवेचनांतील कांहीं भाग अंधानु-करणाचा वाटतो. विशेषतः त्यांनीं सुधाकराला दिलेल्या असाधारण महत्त्वांत ही गोष्ट चट्कन ध्यानांत येते. शेक्स्पिअरच्या ट्रॅजिडींत नायक हा महाप्राण असतो, असें मत ब्रॅडले यांनीं प्रतिपादिलें आहे. 'एकच प्याला' हें नाटक शेक्स्पीरिअन् ट्रॅजिडीच्या जातीचें आहे असें क्षीरसागरांनीं एकदां ठरविल्यावर, ब्रॅडलेच्या पावलावर पाऊल टाकून आपलें लक्ष सुधाकरावर केंद्रित करणें त्यांना भाग पडलें. परंतु असें करतांना त्यांनीं 'एकच प्याला' या नाटकाची जात प्रथम ठरविली न सुधाकराची जात मात्र गृहीत धरली! असें करतांना शेक्स्पिअरच्या 'ट्रॅजिक' नायकांच्या व्यक्तिरेखनांतील सूक्ष्मता, भव्यता व सजीवता ही सुधाकराच्या स्वभावचित्रणांत उतरलीं आहेत काय, हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न त्यांनीं उपस्थितच केला नाहीं. इतकेंच नव्हे तर, शेक्स्पिअरच्या ट्रॅजिडींतील नायिकांना दुय्यम दर्जाचें स्थान असतें म्हणून सिंधूहि तशीच असली पाहिजे, असा त्यांनीं अकारण सिद्धान्त मांडून टाकला आहे. क्षीरसागरांनीं प्रतिपादिलेले व इतर अनेक टीकाकारांनीं उपेक्षि-लेले हे दोन्हीहि निष्कर्ष अत्यंत विवाद्य आहेत.







म्हणून या निष्कर्षांना आव्हान देण्यासाठींच प्रस्तुत लेखाचा प्रपंच करण्यांत आला आहे.

## आंतरिक विकसनशीलतेची कसोटी

ट्रॅजिडीमधील प्रमुख व्यक्तीचा जर शोध घ्यावयाचा असेल तर तिला नाट्यांतील केवळ कथाभागाच्या पार्श्वभूमीवर पाहून चालावयाचें नाहीं; तर नाट्यकृतींत दाखविलेल्या इतर व्यक्तींच्या व त्यांच्यामागें उभ्या असलेल्या ( आणि खऱ्या डोळस रसिकालाच दिसणाऱ्या ) सर्व मानव-समूहाच्या पार्श्वभूमीवर बघावें लागेल. कथानकाचा ओघ कोणताहि एखादा आवागो बदलूं शकेल. परंतु मानवसमूहापेक्षां उच्चतर मूल्यात्मक बैठक, ' It is pleasure to die ' असें म्हणणाऱ्या एखाद्या मुक्तात्मा अथेल्लोलाच शक्य आहे. ट्रॅजिडी-मधील नायकाचें अलौकिकत्व आणि त्याच्या व्यक्तित्वाची महात्मता हीं त्याच्या आंतर-कालाच्या अलौकिक गतीवर ठरत असतात आणि या गतीमध्येंच ट्रॅजिडीचीं बीजें असतात. हा आंतर-काल ट्रॅजिडीच्या नायकाला सर्वांगीण ' एकाकित्व ' ( ' tragic isolation ' ) प्राप्त करून देतो. नुसती सामाजिक दृष्ट्या महत्त्वाची व उच्च अशी जागा भूषविण्यानें हें 'एका-कित्व ' व अलौकिकत्व येत नाहीं. हें अलौकिकत्व नुसतें एखाद्या गुणविशेषाच्या अतिरेकानें येत नाहीं. अलौकिकत्व जें येतें तें उराशीं बाळगलेल्या मूल्यांच्या जातीमुळें. युद्धाच्या लटेंत सांपडून पराक्रमाचें शिखर गांठणाऱ्या वीरापेक्षां, सृजनशील व समाज-निरपेक्ष व्यक्तित्वाच्या आंतल्या आवाजानें दिलेल्या शांतिसंदेशाला जागणारा युद्धविरोधक हा, या आंतरकालाच्या दृष्टीनें, मानवसमूहाच्या शतयोजनें पुढें व म्हणून एकाकी व अलौकिक असतो. कारण, पहिल्याजवळचीं मूल्यें हीं सामाजिक आहेत, तर दुसऱ्याजवळचीं व्यक्तिगत आहेत ! पहिल्या प्रकार-च्या मूल्यांचा उगम, विकास व अन्त समाजाच्या एका विशिष्ट अवस्थेवर अवलंबून असतो, तर दुसऱ्याची धारणा समाजनिरपेक्ष विकसनशील व्यक्तित्वावर अधिष्ठित असते. कळप करून राहणें ही पशूंची चिरंतन स्थिति व कळपांत पूर्ण मिसळून जाणें ही त्यांची संस्कृति होय ! परंतु अशा प्रकारची सामाजिकता मानवी संस्कृतीच्या इतिहासाची मात्र केवळ प्राथमिक अवस्थाच आहे. मानवी संस्कृतीची प्रगति सामाजिक व व्यक्तिनिरपेक्ष लटेंतून झालेली नसून, एकेका प्रगल्भ, आणि म्हणून प्रभावी, व्यक्तीच्या बंडखोरींतून निर्माण झालेली आहे. मानवी महात्मता व अलौकिकता हीं या आंतरिक वेगळेपणानें निर्माण होतात. ट्रॅजिडी या वाङ्मयप्रकाराकडे इतक्या विशाल मानवी पार्श्वभूमी-वरून बघितल्यास असा प्रत्यय येतो कीं, ट्रॅजिडीचा नायक सामाजिक मूल्यांच्या अतिरेकानें ट्रॅजिक, अलौकिक महात्मा ठरत नाहीं तर केवळ व्यक्ति-गत मूल्यांच्या धारणेमधून होणाऱ्या त्याच्या आंतर-कालाच्या लोकविलक्षण गतीनेंच ही महात्मता त्यास प्राप्त होते. हा निकष शेक्स्पिअरच्या नाय-कांना लावला तर ते या कसोटीस पूर्णपणें उतरतात. तोच निकष सुधाकराला लावला तर मात्र वेगळाच चमत्कार दृष्टीस पडतो.

## सुधाकर : एक पिचलेला पोकळ बांबू !

या नव्या दृष्टिकोनांतून सुधाकराकडे बघितलें असतां एकच मूलभूत प्रश्न आपल्या मनांत निर्माण होतो. तो असा कीं, सुधाकरांत ही आंतरिक विकसन-शीलता आहे काय ? समाजनिरपेक्ष अशी कोणती शक्ति त्याच्यांत आहे कीं जिच्या योगानें त्याचें 'एकाकित्व' (म्हणजे अर्थातच नुसता एकलकोंडेपणा वा एककल्लीपणा नव्हे ! ) जीवनप्रेरक व विकसन-शील होईल ? सुधाकराला समाजाच्या पार्श्वभूमी-वरून पाहिला तर त्याच्यांत अलौकिक, महान् असें व्यक्तित्व दिसतें काय ? म्हणजे पर्यायानें, सुधाकर ट्रॅजिडीचा नायक या पदवीस पात्र आहे काय ?

सुधाकराच्या मनाचें विश्लेषण क्षीरसागरांइतकें पद्धतशीर दुसऱ्या कोणत्याहि टीकाकारानें केलेलें नसल्यानें, त्यांना सुधाकराविषयीं काय म्हणावयाचें आहे हें पाहणें अत्यावश्यक ठरतें. त्यांच्या मतानें सुधाकर हा... "पाणीदार, कर्तबगार, बुद्धिमान्, सरळ, सत्प्रवृत्त, गुणवान्, हौशी, प्रेमळ, मानी व उतावीळ असा पुरुषोत्तम " आहे. परंतु या सर्व गुणविशेषांमध्यें सर्वांत महत्त्वाचे, त्याला ट्रॅजिक नायक या पदवीस पात्र करणारे असे दोन गुण क्षीरसागरांनीं कटाक्षानें वेगळे काढले आहेत. ते








म्हणतात : " ( या नाटकाचा ) गाभा म्हणजे बाजारी निगरगट्ट आणि मठ्ठ अशा जगांत मानी आणि सरळ मनाचा कोंडमारा. " या दोन गुणविशेषां-कडे लक्ष देण्याच्या आधीं त्यांच्या इतर गुणांना हातावेगळें करणें विवेचनाच्या दृष्टीनें उपकारक होईल. क्षीरसागरांनीं दिलेल्या यादींतील बरेचसे गुण अजिबात अलौकिक नाहींत, तर ते केवळ सद्गृहस्थी ( gentlemanly ) आहेत. ' सरलत्व ' हा गुणविशेष खरें पाहिलें असतां पाण्याइतका निर्गुण आहे. इतर कोणत्या तरी गुणाची जोड दिल्याखेरीज त्याला महत्त्व नाहीं. आपल्या मठ्ठ व निगरगट्ट जगांत, साऱ्या अर्थांनीं धोपटमार्गी आणि ज्यांच्या सरलत्वाबद्दलची ग्वाही कोणताहि कावळा देखील देईल, असे किती तरी गर्दभराज आहेत ! परंतु याच सरलत्वामुळें त्यांना कुंभारवाड्यांतून उचलून ट्रॅजिडीचे नायक कोणी बनविल्याचें ऐकिवांत नाहीं !

उरता उरला सुधाकराचा ' मानीपणा '. हा गुणविशेष बऱ्याच अंशीं फसवा आहे. कारण बऱ्याच गोष्टी या शब्दांत सामावलेल्या आहेत. समाजांतील कोणाहि लब्धप्रतिष्ठिताला स्वतः-विषयीं वाटणाऱ्या भावनेला ' मानीपणा ' म्हणतात. परंतु यापेक्षांहि खोलवर जाणारा अर्थ मानीपणाच्या कल्पनेंत सामावतो. यथार्थानें जिला मानवी असें म्हणतां येईल अशा प्रत्येक व्यक्तींत आपल्या आंतरिक व्यक्तिधर्माच्या विकासाची सांगता व्हावी अशी एक प्रबळ व नैसर्गिक इच्छा असते. लॉरेन्स-च्या लेडी चॅटर्लेनें आपलें स्त्रीत्व पूर्ण विकसित करण्यासाठीं समाजानें हलक्या गणलेल्या माणसाशीं संबंध ठेवला, त्यांत तिला खऱ्या अर्थानें अपमाना-स्पद कांहींच नव्हतें; कारण व्यक्तिगत दृष्टिकोनांतून पाहतां तिची ही कृति आंतरिक सृजनशील व्यक्ति-त्वाच्या पूर्णत्वाप्रत जाण्याच्या इच्छेची अभिव्यक्ति होती. पण उलट एखाद्या चांगुणेसारख्या वत्सल मातेला आपल्या पोटच्या गोळ्याचा सामाजिक सत्त्वपालनार्थ वध करावा लागला, तर मात्र तिला ती खऱ्या अर्थानें ( सामाजिक अर्थानें नव्हे ) मान-खंडना वाटेल. गुलाबाला सुवास जसा नैसर्गिक, तशीच विकसनशील व्यक्तित्वाला ही नैसर्गिक आत्मप्रतिष्ठा असते ! ही पूर्णांशानें समाजनिरपेक्ष असते. परंतु खऱ्या आत्मप्रतिष्ठेच्या जागीं समाजांत मात्र अनेक प्रकारचीं खोटीं नाणीं दिसतात. ' किंग लिअर ' नाटकांतील पहिल्या प्रवेशांतील लिअर हा या खोट्या मानीपणाचें प्रतीक होय. हा मानीपणा मानवसमूहाच्या ' माणसाळलेल्या ' ( socialised ) आयुष्यक्रमावर पूर्णपणानें आधार-लेला असून, तो व्यक्तित्वांतून उगम पावत नाहीं. खऱ्या आत्मप्रतिष्ठेप्रमाणें हा खोटा मानीपणा आंतरिक विकासाला कारणीभूत होत नाहीं. सुधाकराकडे व त्याच्या गतायुष्याकडे पाहिलें असतां त्याचा मानीपणा हा पूर्णपणें दुसऱ्या प्रकारचा होता, केवळ समाजांतील सन्मानसोपानावर टांगलेला होता हें चटकन कळतें. सुधाकराच्या सामाजिक आयुष्याची सुरुवात " जनसमुद्राच्या गरीब तळाशीं " झालेली आहे, " केवळ स्वावलंबनानें नांवलौकिकाला चढल्यानें त्याचा मूळचा मानीपणा हल्लीं उग्र स्वरूपाचा झाला आहे " आणि " त्यांतून व्यवहारी आयुष्याच्या सुरुवातीच्या अवस्थेतून तो मार्गक्रमण करीत आहे, प्रतिस्पर्ध्यांच्या गर्दीतून आपल्या बुद्धिमत्तेला शोभण्याजोग्या स्थळीं त्याला अजून पोंचायचें आहे. " या रामलालकृत स्तुती-मधून काय दिसतें ? ' धंद्याचें पटांगण ' हेंच त्याचें मर्दुमकीचें स्थान आहे व या व्यवसायात्मक क्षेत्रांत आपल्या प्रचंड बुद्धिमत्तेला शोभणारें स्थान मिळविणें हें त्याचें ध्येय आहे व या पटांगणांत त्याचें कौतुक करणाऱ्या हृदयाची त्याला जरूरी आहे. त्याच्या आयुष्यक्रमाच्या दिशेवरून तरी अशी खात्री वाटते कीं, ज्या " बाजारी निगरगट्ट आणि मठ्ठ " जगाला क्षीरसागर ( रास्तपणानें ) दूषणें देतात त्या जगांतील बाजाराचीं नाणीं सुधाकरानें आधींच स्वीकारलीं होतीं. प्रस्तुत नाटकांतील पहिल्या प्रवेशांत दिसणारा सुधाकर केवळ सामाजिक दृष्टीनें यशस्वी झालेला सद्गृहस्थ वाटतो. सुधाकरांत तडफ व बुद्धिमत्ता असेल, परंतु त्याचें ध्येय मात्र पूर्णपणें माणसाळलेलें ( socialised ) होतें; त्याच्यांत आंतरिक अलौकिकत्व कोठेंच दिसत नाहीं. सुधाकराची सर्व किंमत सामाजिक नाण्यांत मोजतां येण्याजोगी होती. आणि मुनफानें केलेला त्याचा अपमान हा त्याच्या सृजनशील आंतरिक








# पुन्हां एकदां 'एकच प्याला'

व्यक्तित्वाचा नसून उपऱ्या नाण्यांचा होता आणि त्यामुळेंच तो या "व्यवसायात्मक क्षेत्रांतील असंतोषानें" मुळापासून ढवळला जातो. डी. एच्. लॉरेन्स्नें गाल्स्वर्दीच्या फोरसाइट कुटुंबियांविषयीं काढलेले उद्‌गार सुधाकराला तंतोतंत लागूं पडतात. तो म्हणतो : "Yet, not one of them seems to be a really vivid human being. They are social beings. They seem to have lost caste as human beings and to have sunk to the level of the social being, that peculiar creature that takes the place, in our civilization, of the slave in the old civilization. The free moral and the slave moral; the human moral and the social moral—these are abiding antitheses."

सुधाकर सामाजिक अर्थानें प्रखर चंडांशु भासला, तरी आत्मिक अर्थानें क्षुद्र आणि पोकळ वाटतो, तो यामुळेंच! कोर्टीतील अपमानाच्या स्वरूपांत वास्तवाचा पहिला फटका खाल्ल्यानंतरचें सुधाकराचें जीवन याच गोष्टीची साक्ष देतें. 'कोन्राड'चा लॉर्ड जिम् आपलें व्यक्तिगत ध्येय गांठण्यासाठीं आपलें सर्व जीवन वेंचतो व हंसत मृत्यूला आव्हान देतो. तर उलट सुधाकर दारूच्या पलायनवादाचा आश्रय करतो. आत्महत्या करण्याचें मनोधैर्यहि त्याचेजवळ नाहीं. दारूचें सामाजिक स्थान कांहींहि असो; प्रस्तुत व्यक्तीच्या आत्मिक जीवनांत मात्र तिला पलायनवादाचेंच स्थान प्राप्त झालें आहे. (व्यक्तिवादी दृष्टिकोनांतून 'एकच प्याला'कडे बघणाऱ्या क्षीरसागरांच्या भेदक दृष्टीला ही गोष्ट लक्षांत येऊं नये हें दुर्दैवच म्हणावें लागेल!) या पलायनवादाचा आश्रय केल्यानंतरचें सुधाकराचें जीवन म्हणजे कणा नसलेल्या जखमी कीटकाचें करुणास्पद रुदन आहे. सिंधूच्या उज्ज्वल प्रीतीच्या भव्योत्कट दर्शनानें, पुन्हां सुधाकरांत क्षणिक परिवर्तन होतें हें खरें! परंतु तेवढ्यानें तो गाणसाळलेल्या मूल्यांच्या दडपणांतून मुक्त होऊं शकत नाहीं. म्हणून सुधाकराची आत्महत्या, सामाजिक अपमान आणि दारूचा पलायनवाद यांमुळें एकादा पिचलेला पोकळ बांबू मोडून पडावा, तशी वाटते.

## आत्मप्रकटीकरण कीं आतषबाजी ?

शेक्स्पिअरचे ट्रॅजिक नायक खऱ्या अर्थानें काव्यात्मे (Poetic Souls) असतात. आंत सदैव वसत असलेल्या प्रभावी सृजक कल्पनाशक्तीमुळेंच त्यांना मानवसमूहापेक्षां उच्चतर मूल्याची धारणा करणें व त्यांतून अखेरीस मुक्तावस्था गांठणें शक्य होतें. स्वतः गडकरी 'पूर्णतः कवि' असल्याची ग्वाही क्षीरसागरांनीं दिलेली आहे. प्रश्न आहे तो इतकाच कीं, ही काव्यात्मता सुधाकरांत दिसते का? कारण काव्याचीं बीजें जर त्याच्यांत असतील तर तो दिसतो तेवढा पांगळा झाला नसता. वरकरणीं मन मोहून टाकणारीं सुधाकराचीं पल्लेदार भाषणें, हीं प्रत्यक्षांत आत्मप्रकटीकरण किती करतात आणि शब्दालंकारांनीं आणि सुभाषितांनीं नटलेली व्याख्यानबाजी कितपत दर्शवितात हें हंस-क्षीर-न्यायानें शोधणें अत्यावश्यक ठरतें. कारण शेक्स्पिअरच्या काव्याचे आधुनिक टीकाकार रायलँड म्हणतात : "By rhetorical is meant one in which either the dramatist himself or a particular character is more concerned with working upon the emotions of the audience than with expressing and communicating his own experience." 'एकच प्याला'तील रामलाल हा बोलूनचालून कोणत्याहि ठिकाणचा 'शनवारवाडा' करणारा वक्ता आहे. परंतु सुधाकराचीं भाषणें तरी यापेक्षां वेगळें काय दर्शवितात? सुधाकराच्या भाषणांतील मांडणी वक्तृत्वगुणाच्या अनुरोधानें केलेली आहे. त्यांच्यांतील डौलानें चढत जाणारी रचना, शाब्दिक कसरती, कोटिबाजपणा, तीनतीन गुणविशेषांची जोडीनें केलेली योजना, अतिरिक्त आलंकारिकता, सुभाषितप्रचुरता—इत्यादि गोष्टींची सहेतुक योजना याच गोष्टीची साक्ष देईल. शेक्स्पिअरच्या महान् ट्रॅजिक कलाकृतींचे नायक अशा आतषबाजीला बळी पडलेले दिसत नाहींत. त्यांचें प्रत्येक भाषण त्यांच्या आंतर-जीवनांतील अवस्थांतरांचें नवप्रत्यया-

त्मक दर्शन घडवितात. त्यांचा प्रत्येक शब्द त्यांना 'घडवीत' असतो. इतरांना आतषबाजीनें नजरबंद करण्याइतका मोकळा वेळच त्यांना नसतो! याच्या बरोबर उलट स्थिति सुधाकराच्या भाषणांत दिसते. त्याचीं स्वगतभाषणें वाचूं लागतांच आंतर-जगताचा मोटा नकाशा समोर ठेवून बोलणारा तो कोणी ठोकळेबाज भूगोल-शिक्षकच आहे असें वाचकांस वाटूं लागतें. पण तसें पाहिलें तर सिंधूखेरीज सारीं महत्त्वाचीं पात्रें अचाट वक्तृत्वानें आपल्यावरील आत्मप्रकटीकरणाची जबाबदारी टाळत असलेलीं दिसून येत नाहींत काय? याचें खरें कारण असें आहे कीं, सिंधूखेरीज या नाटकांतील सर्व पात्रें पूर्णांशानें माणसाळलेलीं (socialised), व्यक्तित्वाच्या दृष्टीनें निर्जीव अशीं आहेत. एवंच, ट्रॅजिक नायकाला लागणारे कोणतेहि गुणधर्म सुधाकराच्या चित्रणांत उतरले नसल्यानें, सुधाकर हा या नाटकाचा नायकहि नव्हे आणि टीकाकारांनीं महत्त्व द्यावें इतकें महत्त्वाचें पात्रहि नव्हे. नाटकाच्या लोकप्रियतेचें आणि आजवरच्या यशाचें रहस्य सुधाकरापेक्षां सिंधूतच सांपडण्याची अधिक शक्यता आहे.

### सिंधूच नाटकाचा कणा होय

या नाटकांतील ट्रॅजिडीचीं बीजें सुधाकराच्या व्यक्तिरेखेंत नसून अनेकांनीं उपेक्षिलेल्या सिंधूच्या व्यक्तित्वांत आहेत, ही त्यांतील खरी गोष्ट आहे. भाषणबंदीचा जणूं हुकूम घेऊन रंगभूमीवर वावरणाऱ्या सिंधूनें प्रेक्षक-वाचकांवर कांहीं अंशानें निश्चित परिणाम घडवून आणला, याला कारण केवळ बालगंधर्वांची वजनदार भूमिका हें नव्हे!

ट्रॅजिक नायकाबद्दल लेखाच्या आरंभीं जें विवेचन केलें व जे निकष शोधले, ते सिंधूला लावले तर ती त्या दिव्य कसोटीला बऱ्याच अंशानें उतरते. सुधाकरानें सामाजिक अर्थानें आपलें जीवन स्वतःच घडविलें असलें, तरी तो आंतरिक जीवनाच्या दृष्टीनें पांगळाच राहिला होता. उलट, श्रीमंतींत वाढलेल्या सिंधूमध्यें आंतरिक सामर्थ्य आहे. सामाजिक नाण्यांना महत्त्व देऊन, तीं खोटीं निघाल्याबरोबर अक्षरशः रंक होण्याइतकी सिंधू 'माणसाळलेली' (socialised) नाहीं. तिच्यांत व्यक्तिगत मूल्यांच्या धारणेला आवश्यक असा सृजक जिवन्तपणा आहे. तिच्या आत्मिक शक्तीमध्यें प्रमुख म्हणजे तिची सुधाकरावरील प्रीति ही होय. सुधाकरावरील तिचें प्रेम हें 'नवरा' या संस्थेवर नसून सुधाकर या व्यक्तीवर आहे. याबद्दलचें विवेचन प्रा. वसंत कानेटकर यांनीं 'समीक्षक'मध्यें लिहिलेल्या "गडकऱ्यांचे टीकाकार व 'एकच प्याला'" या विचारप्रवर्तक लेखांत केलेलें आहे. ते म्हणतात : "सुधाकराकडे बघण्याचा सिंधूचा दृष्टिकोन हा पारंपरिक पतिव्रतेचा नसून ममताळू मातेचा होता. सुधाकराला लागलेलें व्यसन हा त्याला जडलेला रोग आहे आणि त्याच्याशीं झगडण्यासाठीं पडतील ते कष्ट आणि आपदा सोसणें हें आपलें केवळ पत्नी म्हणून नव्हे तर सुधाकरानें तिच्यावर केलेल्या निस्सीम प्रेमाचा मोबदला म्हणून आपलें कर्तव्य आहे, असें सिंधू मानीत होती." वत्सल मातेला ज्याप्रमाणें आपल्या अप्रगल्भ मुलाचा आत्मा घडविणें हें आद्यकर्तव्य वाटतें, त्याप्रमाणेंच सिंधूला वाटत होतें. तिच्या प्रगल्भ व्यक्तित्वाच्या तुलनेनें, सामाजिक पराभवामुळें डोक्यांत राख घालून पळपुटेपणा करणारा सुधाकर पोरकटच वाटतो. सुधाकराच्या दुःखाचें मर्मस्थान म्हणजे त्याच्या आन्तरजीवनाला आलेला पोकळपणा, हें सिंधूनें हेरलें होतें. त्याला सुखी करणें म्हणजे त्याच्या ठायीं व्यक्तिगत सृजक मूल्यें निर्माण करणें, हेंहि तिला ठाऊक होतें. म्हणून लेडी मॅक्बेथप्रमाणें आपल्या पतीला सामाजिक प्रतिष्ठा कशी प्राप्त होईल याची तिनें कधींहि कदर केली नाहीं. लिअरला जशी कॉर्डेलिया तशी सुधाकराला सिंधू! या नरकांत पिचत पडण्यापेक्षां तिनें इब्सेनच्या नोराप्रमाणें तडफदारपणें घराबाहेर पडावयास पाहिजे होतें, असा पल्लाकरी सल्ला देणारे टीकाकार शॉच्या कॅन्डिडाला मात्र विसरतात. सिंधूच्या व्यक्तित्वाच्या प्रकाशांत पाहिलें असतां तिचा नोरा-फॅशनचा तडफदारपणा केवळ नाटकी ठरला असता. सृजनशील व्यक्तित्वाच्या हांकेलाच केवळ साथ देण्याचें तिचें ध्येय होतें. म्हणूनच तिच्यांत नैसर्गिक आत्मप्रतिष्ठा (natural dignity) दिसते. तिच्यांत सुधाकरी सामाजिक मानीपणा नाहीं. तिला दळणकांडण करण्यांत लाज










अनुक्रमणिका

वाटत नाहीं. तिच्यांत सामाजिक अर्थाचा सरळ-पणा देखील नाहीं. कारण डेस्डिमोनासारखी ती खोटें बोलत नाहीं काय? परंतु स्वतःशीं राखलेल्या इमानामुळेंच तिला या सामाजिक खऱ्याखोटयाच्या पलीकडे जाण्याची शक्ति आली व तिच्यांत नैसर्गिक आत्मप्रतिष्ठा देखील विराजमान झाली. आपल्या निष्काम त्यागमय प्रीतीनें, वस्तुस्थितीला न डरतां तोंड देण्याच्या धैर्यानें, आंतरिक समृद्धीच्या व सृजक आंतरजीवनाच्या शब्दातीत दर्शनानें, सुधाकराच्या जीवनांत ही नवमूल्याची संजीवनी निर्माण करणें हाच एकमेव मार्ग तिच्या पुढें होता. आणि लार्ड जिमूच्या निष्ठेनें तिनें तो मार्ग स्वीकारलाहि! तिच्या भाषणांत कृत्रिमता जवळजवळ नाहीं; उलट त्यांत सौंदर्य व सामर्थ्य यांचीं बीजें सांपडतात, त्याचें कारणहि तिचें आंतरिक समृद्ध जीवनच होय.

सुधाकर जरी वरवर पाहणाऱ्यांना ट्रॅजिडीचा नायक वाटला तरी सिंधूच या नाटकाचा कणा आहे. बाकीचीं पात्रें केवळ भडक रंगाचीं, 'जरा टणटणीत नि पारदर्शी' चित्रें आहेत. परंतु महाराष्ट्राचें दुर्दैव असें कीं, सिंधूच्या स्वभाव-चित्रणांतील ट्रॅजिडीचीं बीजें बीजेंच राहिलीं! सिंधूवर लक्ष केंद्रित करून जर या नाटकाची रचना असती तर मराठी सारस्वतांत चिरंतन टिकेल झाली अशा एका मौलिक कलाकृतीची भर पडली असती.

---

## रसिकव्यापाराची सार्थकता

जें व्यक्त झालें आहे त्याहून जें अव्यक्त राहिलें आहे, तें अनंत पटींनीं सुंदर व विशाल आहे, असा संस्कार वाचकाच्या मनावर राहण्यांत कवीच्या व काव्याच्या जन्माचें सार्थक आहे. यालाच मी खरा 'ध्वनि' समजतो. रसध्वनीहूनहि हा 'अनंतध्वनि' विशाल आहे, उदात्त आहे. जर 'सान्ता'-च्या साधनानें 'अनन्ता'चा ध्वनि उमटवायचा नसेल, व्यक्त सौन्दर्यांतून अव्यक्त सौन्दर्याची चाहूल ऐकावयाची नसेल, तर काव्यानंदाला 'ब्रह्मानंदसहोदर' म्हणण्याचा अधिकार आपणांला कसा काय पोहोंचतो?...निर्जीव तत्त्वनिष्ठा ही कलेला व कलास्वादाला मारक आहे हें मला सांगावयाचें आहे. पण कलेंत अनंतत्वाचा ध्वनि उमटवणें व अनिर्वचनीय विश्वात्मक सौन्दर्याची ही 'सहज हालचाल' ऐकून मन्त्र-मुग्ध होणें हें शास्त्रांच्या कक्षेबाहेरचें आहे. जें सौन्दर्य स्वतांत नाहीं, तें बाहेर साकार झालें तरी आपल्याला ओळखतां येणार नाहीं. निसर्गदृश्यांत सौन्दर्य नसतें तर त्या निसर्गदृश्यकलांत चित्रकार आपल्या अंतरंगां-तून स्फुरणारें सौन्दर्य पाहत असतो. सौन्दर्य लैलाच्या शरीरांत नव्हतें–तें तर काळेंसावळेंच होतें!–– तें मजनूच्या डोळ्यांत होतें....ललित कलांचें ध्येय प्रतिकृति हें नव्हे तर नूतन निर्मिति आहे. (Thus in our fine arts, not imitation, but creation is the aim). जें कलेला लागू तें कला-स्वादालाहि लागू आहे. कलेंत जें व्यक्त झालें आहे, त्याचें अलंकारव्याकरणादि तपासणें म्हणजे कला-स्वाद नव्हे. व्यक्त सौन्दर्यांतून अव्यक्त सौन्दर्यापर्यंत पोहोंचणें म्हणजे खरा आस्वाद होय. कारण, अद्याप 'तें' व्यक्त झालें नाहीं हें तुम्हीं ओळखण्यांत कवीला जेवढा आनंद आहे, तेवढा अलंकार ओळखण्यांत नाहीं. कवीला जें शब्दापलीकडचें वाटत आहे, किंवा कदाचित् जें लपविण्यांतच आनंद वाटत आहे, तें लडिवाळ बालकाप्रमाणें त्याच्या पदराशीं झोंबून काढून घेणें यांत रसिकव्यापाराची परिसीमा व सार्थकता आहे. Genius आणि Taste–प्रतिभा आणि सहृदयता या एकाच सुवर्णमुद्रेच्या दोन बाजू आहेत. एकाच नटेश्वराचीं तीं दोन अंगें आहेत.

—प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर

—(गेल्या महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाच्या टीकाविभागाच्या अध्यक्षीय भाषणांतून : १३।१०।५२)



अनुक्रमणिका

पं. रघुनाथशास्त्री कोकजे

# धर्माज्ञांचें मूल्यमापन

नव्या सुधारणांविरुद्ध जुन्यांची श्रद्धा हा संघर्ष प्रसिद्धच आहे. नव्या युगाची गरज किंवा बुद्धिवाद यांच्या आधारावर नव्या सुधारणांचें कितीहि समर्थन केलें तरी त्याचा पुराणमताभिमान्यांवर परिणाम दिसून येत नाहीं. तसें झालें म्हणजे एक तर बुद्धिवादी चिडून वचनप्रामाण्याचें, ग्रंथप्रामाण्याचें किंवा धर्माज्ञांचें महत्त्वच नाकारतो किंवा ' आम्हांला जें योग्य दिसतें तें आम्ही करतों, यांत धर्माज्ञांचा किंवा धर्मशास्त्र काय म्हणतें हें पाहण्याचा संबंध येत नाहीं, ' असें म्हणून परंपराभिमान्यांच्या आक्षेपांना बगल देऊन त्यांतून निसटण्याचा प्रयत्न करतो. पण सुधारणावाद्यानें यांपैकीं कोणताहि मार्ग स्वीकारला तरी त्यामुळें वचनप्रामाण्यावर भर देणाऱ्या पक्षाचें कार्य आयतेंच साधतें. जुनीं शास्त्रें आणि धर्मग्रंथ यांवर बहुजनसमाजाचा विश्वास परंपरेमुळें दृढ असतो. तीं शास्त्रें किंवा ते धर्मग्रंथ प्रमाण कां मानावे हा त्यांच्यापुढें प्रश्नच नसतो. यामुळें बहुजनसमाज शास्त्रवचन सोडून असलेल्या सुधारणा मान्य करीत नाहीं. त्याच्या प्रतिगामी पुढाऱ्यांपुढें ' या सुधारणा शास्त्रवचनांविरुद्ध आहेत ' एवढेंच प्रमेय पटवून देण्याचें काम असते. अशा वेळीं सुधारकांच्या तोंडून ' आम्ही शास्त्र जाणीत नाहीं ' किंवा ' या सुधारणेचा शास्त्राशीं संबंध नाहीं ' असें उत्तर आलें कीं प्रतिगाम्यांचें आयतेंच कार्य साधतें. दिसण्यांत बुद्धिवादी किंवा सडेतोड दिसणारीं सुधारकांचीं असलीं वक्तव्यें कितीहि सत्य असलीं तरी तीं बहुजनसमाजाच्या मनोभूमिकेंत कसा विपरीत परिणाम घडवून आणतात याचा त्यांनीं विचार न केल्यामुळेंच असें होतें. शहरांतील मूठभर सुशिक्षितांच्या गटाबाहेर अथांग पसरलेल्या बहुजनसमाजांत सुधारणेचा प्रसार होण्याच्या मार्गांत ही मोठी घोंड पडलेली आहे. याचीं उदाहरणें, विधवाविवाह, संमतिवयाचा कायदा इत्यादि जुन्या विषयांपासून तों अलिकडील हिंदु-कोडासारख्या विषयांवरील आंदोलनापर्यंत सर्व विषयांचें निरीक्षण केल्यास, हवीं तेवढीं सांपडतील. पाश्चात्त्य देशांतहि त्यांचें पवित्र शास्त्र जें बायबल त्यांतील भूगोल, विश्वरचना, तसेंच पदार्थविज्ञान यांविषयींच्या सिद्धान्ताविरुद्ध प्रतिपादन करणाऱ्या गॅलिलिओ, ब्रूनो इत्यादि शास्त्रवेत्त्यांचा झालेला छळ प्रसिद्धच आहे. म्हणजे परंपरेच्या आधारावांचून सुधारणा जनतेच्या गळीं उतरत नाहींत; आणि बहुतेक सुधारणांस परंपरेचा आधार मिळूं शकत नाहीं असा हा पेंचप्रसंग आहे. ' धरलें तर चावतें, सोडलें तर पळतें ' या म्हणीचें सत्यत्व अशा उदाहरणांत चांगलें प्रत्ययास येतें. शास्त्र, परंपरा यांस धरावें तर त्यांतील प्रतिगामी कांटे टोंचूं लागतात; उलट, ते सोडून द्यावे तर कांट्यांबरोबर गुलाबी सुवासाच्या आकर्षणास मुकावें लागतें, अशी स्थिति सुधारणा आणि शास्त्रप्रामाण्य म्हणजे धर्माज्ञा यांचा समन्वय साधूं पाहणाऱ्यांची होऊन जाते. या अडचणींतून कांहीं मार्ग निघूं शकतो काय, या प्रश्नाचा येथें विचार करण्याचें योजिलें आहे.

## धर्माज्ञाभंगाची परंपरा

लोक धर्मशास्त्रोक्त आज्ञांचें पालन करीत नाहींत ही वस्तुस्थिति अलिकडेच उत्पन्न झालेली नसून फार जुनी आहे, हें येथें प्रथम ध्यानांत घेतलें पाहिजे. गौतम ( १.३–४ ), आपस्तंब ( २.६.१३ ) इत्यादिकांनीं नांवनिशी दाखवून त्या त्या देशांतील धर्माज्ञांविरोधी रूढी उघड केलेल्या आहेत. कुमारिलभट्टानें तर ' मथुरावासी ब्राह्मण स्त्रियांचें सुरापान, घोडा इत्यादि दोन्हींकडचे दांत असलेल्या प्राण्यांचा दान-विक्रय, मामाच्या मुलीशीं लग्न, चौरंगावर भोजन, सर्व वर्णांनीं स्पर्शिलेला विडा खाणें आणि तो खाल्ल्यावर आचमन न करणें, धोब्यानें धुऊन गाढवावरून आणलेले कपडे वापरणें '








इत्यादि त्या वेळच्या धर्माज्ञाभंगाची लांबलचक यादीच दिलेली आहे.[1] त्यांतील कित्येक अधार्मिक आचार आजहि चालूच आहेत. यावरून केवळ धर्माज्ञा म्हणूनच ती लोक पाळतात असें मानणें खरें नाहीं हें कळून येतें. जनतेंतील या धर्माज्ञा-भंगाचें यथार्थ चित्र वाचकांपुढें यावें म्हणून आधुनिक काळांतील धर्माज्ञाभंगाकडे आतां वळलें पाहिजे.

तसें करतांना अगदीं अलिकडील अनाचार विचारांत घेणें न्याय्य होणार नाहीं. म्हणून अलिकडील नास्तिक्याचें वातावरण सुरू होण्यापूर्वीचा काळ आपण घेऊं. पेशवाईंतील धार्मिक समजल्या गेलेल्यांच्या आचरणांत धर्माज्ञापालन योग्य प्रकारें होत असावें अशी कल्पना असते. म्हणून तत्कालीन एखाद्या परंपराभिमानी आचारशीलाचें वर्तन आपण धर्माज्ञेच्या कसोटीवर घासून पाहूं. अशा व्यक्तीच्या आचारांत सर्व कांहीं धर्माज्ञांस धरूनच असलें पाहिजे अशी जुन्यांची अपेक्षा असते आणि तिच्या बळावरच ते नव्यांच्या आचारभ्रष्टतेवर तुटून पडतात. म्हणून हें त्यांचें वाटणें कितपत यथार्थ असेल याचा आतां विचार करूं.

प्रातर्विधीनंतर शरीराच्या निरनिराळ्या अवयवांना किती वेळां माती लावून ते शुद्ध करावेत याविषयीं मनूची स्पष्ट आज्ञा आहे. लिंगाला एकदां, गुदाला तीनदां, डाव्या हाताला दहा वेळां, नंतर दोन्ही हातांस सात वेळां, याप्रमाणें शरीरशुद्ध्यर्थ माती लावावी, अशी मनूची आज्ञा आहे (मनु ५·१३६). तिचें पालन पेशवाईंतहि कोणी करीत नव्हतें. शौचाहून आल्यावर दोन-तीन वेळां डाव्या हाताला माती लावण्याची प्रथा होती. परंतु वरील आज्ञेंत त्याशिवाय अधिक किती तरी सांगितलेलें आहे. त्याचें पालन पूर्वीं कोणी करीत नव्हतें. एवढेंच नव्हे तर, त्यांतील कित्येक धर्माज्ञांचें पालन कित्येकांच्या गांवींहि नव्हतें, हें मान्य केलें पाहिजे. मनूच्या या प्रातर्विधिसंबंधांतील आज्ञेचा भंग केल्यामुळें आमचे पूर्वज पतित मानले गेले नाहींत, हें उघड आहे.

सर्व स्मृतिकारांनीं दांतवणीनें म्हणजे विशिष्ट झाडाच्या काड्या आणून त्यांच्या साह्यानें दंत-धावन करण्यास सांगितलेलें असून, हाताच्या बोटानें दांत घासूं नयेत, असें निक्षून सांगितलें आहे ('आचारमयूख' २२). असें असतां महाराष्ट्रांत बोटावर राखुंडी लपेटून तसल्या बोटानें दांत घासण्याची प्रथा कोणीं कशी पाडली असेल याचा विचारच केला पाहिजे. हा 'दंतधावना' विषयींच्या धर्माज्ञेचा भंग पूर्वजांनीं कसा सहन केला हें जाणून घेतलें पाहिजे.

भोजनासाठीं ताटें घेण्याची पद्धत अलिकडील आहे. जुनी प्रथा पत्रावळी किंवा पानें वापरण्याची होती. पत्रावळीसाठीं पळसाचीं किंवा वडाचीं पानें पूर्वीपासून वापरलीं जातात. पण धर्माज्ञा असल्या पानांविरुद्ध आहे. खाद्यपदार्थांविषयीं तर बराच धर्माज्ञाभंग दिसून येतो. लसूण, कांदा, खरवस, गावकोंबडा इत्यादि बरेच पदार्थ ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांस निषिद्ध आहेत. यांतील कांदा तर अत्यंत निषिद्ध असून एकदां जरी कांदा खाल्ला तरी खाणारा पतित होतो. अर्थात पतित प्रायश्चित्त करून पुनः उपनयन केल्याशिवाय तो शुद्ध होत नाहीं. जें कांदा खाणें शास्त्राज्ञेप्रमाणें इतकें निषिद्ध, त्याची बोळवण महाराष्ट्रीयांनीं चातुर्मास्यापुरती मर्यादित करून चातुर्मास्याबाहेर कांदा खाणारा पतित होत नाहीं असें कोणत्या प्रणालीनें ठरवून घेतलें आणि कांदेनवमीचें माहात्म्य केव्हां उत्पन्न केलें हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. त्रैवर्णिकांनीं चातुर्मास्याबाहेरदेखील कांदा वर्ज्य करावा अशी शास्त्राज्ञा आहे. ही शास्त्राज्ञा जुन्या

---

१. मथुरानिवासिब्राह्मणीनां सुरापानम्, केसर्यश्वाश्वतरखरोष्ट्रोभयतोदद्दानविक्रयव्यवहारः, मातुल-दुहितृद्वाहासन्दीस्थभोजनादीनि, सर्ववर्णपरस्परस्पृष्टताम्बूलादन-तदवसानानाचमन-निर्णेजकधौतगर्दभारूढवस्त्र-परिधानादीनि । —तंत्रवार्तिक १.३.२

(या लेखांतील या व पुढील संस्कृत वचनांचे अनुवाद शब्दशः नसून तात्पर्यशः आहेत.)








धर्माभिमान्यांनीं-निदान महाराष्ट्रीय धार्मिकांनीं- गुंडाळून ठेवली आहे.

### आचारलोप

कित्येक धर्मशास्त्रोक्त आचार जुन्या काळींच लुप्त झालेले असून, त्यांत जुन्यांस शास्त्राज्ञाभंग जाणवला नाहीं, असें सहज दाखवितां येईल. उदा० दोन्ही जेवणांपूर्वी म्हणजे दुपारीं आणि रात्रीं असा दोनदां वैश्वदेव करावा (मनु. ३·१२१) असें मन्वादिकांनीं स्पष्ट आदेशिलें असून, दोन्ही काळचे वैश्वदेव एकदांच करण्याची प्रथा पडलेली असून, तशा अर्थाचा संकल्पहि बनविला गेला आहे. म्हणजे शास्त्राज्ञा झुगारून सायंवैश्वदेवाच्या आचाराचा लोप पूर्वकाळींच केला गेला.

दर वर्षी श्रावणांत आपण उपाकर्म किंवा श्रावणी करतों हें सर्वांस माहीत आहे. पण त्याचप्रमाणें माघांत करण्यास सांगितलेल्या उत्सर्जनाची करुण कहाणी पाहिली म्हणजे धर्माज्ञांकडे जुने लोकच विशेष कटाक्षानें लक्ष देत नव्हते हें दिसून येईल. माघांत करावयाचें हें कृत्य सध्यां श्रावणांत श्रावणीच्याच (उपाकर्माच्याच) दिवशीं प्रथम केलें जातें. हें माघांत न करण्याची रूढी बरीच जुनी आहे. मानवगृह्यसूत्रा-वरील भाष्यकार अष्टावक्र('अष्टावक्रभाष्यम्' १·५·१) यानें 'त्या वेळीं (माघांत) उत्सर्जनाचें अनुष्ठान करणारे दिसून येत नाहींत तेव्हां काय करावें ? कोणास दोष द्यावा ?' असे खेदाचे उद्गार काढले आहेत. एका ग्रंथकारानें ('स्मृत्यर्थसारः', पृ. ११) तर उपाकर्माच्या दिवशीं उत्सर्जन करावें किंवा मुळीं तें करूंच नये असें म्हणण्यापर्यंत धैर्य दाखविलें आहे. पण तें कसेंहि असलें तरी उत्सर्जनाचा प्रकार जुन्या काळींच मागें टाकला गेला हें उघड होतें. असल्या धर्माज्ञाभंगांकडे जुन्यांचें वा नव्यांचें दुर्लक्ष असल्यामुळेंच जुन्या-नव्यांतील मतभेद विकोपास जातात.

### संस्कारांची परवड

गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, कर्णवेध यांपैकीं एकहि संस्कार धर्मग्रंथाप्रमाणें होत नाहीं. या प्रत्येक संस्कारांत होमहवन आहे एवढें सांगितलें म्हणजे सध्यां डोहाळेजेवण, बारसें इत्यादिप्रसंगीं जे सोहाळे होतात, ते शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें नसतात हें कळून येईल. गर्भाधानसंस्कारप्रसंगीं हल्लीं होम करतात. पण त्यांत ऋतुशांतीची भेसळ असते. गर्भाधानसंस्कारांत होम आहे, पण तो शयनगृहांत पतिपत्नींनीं एकांतांत रात्रीं करण्याविषयीं शास्त्राज्ञा आहे एवढें सांगितलें म्हणजे आज ऋतुशांति म्हणून रूढ असलेला विधि हा गर्भाधानसंस्कार नव्हे, हें कळून येईल. बाकीच्या डोहाळजेवण इत्यादिकांत होमाचा संबंधच येत नसल्यामुळें, शास्त्रोक्त पुंसवनादि संस्कारांस जुन्या काळींच अर्धचंद्र मिळालेला आहे, हें कळून येईल. चौल किंवा चूडाकर्म हा संस्कार पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षी करावा अशी मनूची अज्ञा असून, आठव्या वर्षी किंवा त्यानंतर तो उपनयनाच्या वेळीं केला जातो. पेशवाईपूर्वीपासूनच ही रूढि पडलेली असावी. सर्व संस्कारांची ही परवड जुन्या काळीं कशी सहन केली गेली हा प्रश्न आतां विचारांत घेऊं.

अनेक विषयांत स्वतः शास्त्राज्ञा गुंडाळून ठेवणारेच जेव्हां नव्या सुधारणांवर तुटून पडतांना शास्त्राज्ञांचा विरोध दर्शवितात, तेव्हां त्यांच्या वर्तनांतील शास्त्राज्ञाविरोधरूपी दिव्याखालील अंधार किती गाढ असतो, हें येथपर्यंतच्या विवेचनावरून ध्यानांत येईल. पण त्या विवेचनाचा उद्देश तेवढाच नाहीं जुन्या काळीं जेव्हां या शास्त्राज्ञाविरोधी प्रथा समाजांत रूढ झाल्या तेव्हां त्या वेळच्या शास्त्रा-भिमान्यांनीं त्या कशा खपवून घेतल्या असतील, हा आपल्यापुढें मुख्य प्रश्न आहे. या प्रश्नाचें विराट् स्वरूप ध्यानीं यावें म्हणूनच अनेक विषयांतील अनेकविध धर्माज्ञाभंगांचें प्रदर्शन येथें केलें आहे. तें ध्यानांत घेतलें म्हणजे त्या काळच्या धर्म-मार्तंडाना हें शास्त्रोल्लंघन कां खुपलें नाहीं असें कोडें पडतें. त्यांना शास्त्र अवगत नव्हतें असें मानणें अयोग्य होईल. तेव्हां आज शास्त्राज्ञांकडे ज्या कठोर दृष्टीनें आपण पाहतों त्याहून निराळ्या दृष्टीनें पूर्वाचार्य पाहत असले पाहिजेत हें उघड होतें. धर्मशास्त्रांतील प्रत्येक आज्ञा आणि निषेध सारख्याच योग्यतेचे असतात, असें आपण आज मानतों. पण प्राचीन समाजधुरीण अशा समान मोलानें सर्व स्मृतिवचनांचें म्हणजे धर्माज्ञांचें मूल्य








ठरवीत नसले पाहिजेत असें मानल्यास, शास्त्राज्ञा आणि प्रत्यक्ष वर्तन यांतील येथवर दाखविलेल्या विसंवादाची उपपत्ति लावतां येईल. शास्त्राज्ञा दोन प्रकारच्या असतात : एक विधायक आणि दुसरी निषेधक. 'दन्तकाष्ठानें दांत घासावे' हें पहिल्या प्रकाराचें उदाहरण असून, 'कांदा खाऊं नये' हें दुसऱ्या प्रकारांतील उदाहरण होय. या दोन्ही प्रकारांच्या आज्ञांचें प्राचीन काळापासून राजरोस उल्लंघन चालूं असूनहि त्यामुळें त्या त्या प्रांतांतील व्यक्ती भ्रष्ट मानल्या गेल्या नाहींत, हें आपण पाहिलें. आतां या प्रकाराची उपपत्ति जाणून घेण्यासाठीं आपण या धर्माज्ञांचें मूल्यमापन करण्याचे कांहीं नियम ठरवितां येतात काय तें पाहूं.

### विवाहप्रकरणांतील विधिनिषेध

धर्माज्ञांचें असें मूल्यमापन करणें अवश्य आहे ही गोष्ट विवाहविषयक विधिनिषेध–विधायक आज्ञा, निषेधक आज्ञा–पाहिले कीं चटकन् ध्यानांत येते. मनुस्मृतींत आणि याज्ञवल्क्यस्मृतींतहि विवाहास योग्य आणि वर्ज्य वधूंचें वर्णन केलेलें आहे. त्यांत सवर्णा, सुलक्षणा, असगोत्रा, निरोगी वधूशीं विवाह करावा असें सांगून, पिंगट केसांची, पांचाहून अधिक बोटें इत्यादि असलेली, नक्षत्र–नदी–वृक्ष यांचें नांव असलेली वधू विवाहास योग्य नव्हे असें सांगितलें आहे ( मनुस्मृति ३. ४–११, याज्ञवल्क्यस्मृति १. ५२–५४). या शास्त्राज्ञा अक्षरशः प्रमाण मानावयाच्या असतील तर काळ्या किंवा कुरूप स्त्रीशीं लग्न करणें शास्त्रविरुद्ध ठरेल. टीकाकारांपुढें ही अडचण उभी होतीच ! पण त्यांतून सुटून जाण्यासाठीं "सुस्वरूप इत्यादि नियम ऐहिक म्हणजे लौकिक प्रयोजनार्थ असल्यामुळें ते प्रमाण मानूं नयेत. म्हणजे त्यांचा भंग करून एखाद्यानें लग्न केलें तरी तें असिद्ध ठरणार नाहीं. पण सपिंडेशीं लग्न करूं नये, सगोत्रेशीं विवाह करूं नये इत्यादि नियमांचें ऐहिक प्रयोजन दिसून येत नसल्यामुळें त्यांचा भंग करून केलेला विवाह असिद्ध ठरेल." असें त्यांनीं स्पष्टीकरण दिलें आहे.[२] पण हें स्पष्टीकरण मनुयाज्ञवल्क्यांस संमत होतें असें दिसत नाहीं. कारण तसें असतें तर त्यांनीं विवाहासाठीं विशेष महत्त्वाचीं विशेषणें एका ठिकाणीं सांगून कमी महत्त्वाचीं अन्यत्र सांगितलीं असतीं. परंतु वरील दोन्ही प्रकारच्या विशेषणांची त्यांनीं जी गल्लत केलेली दिसून येते त्यावरून त्यांचा हेतु टीकाकारांप्रमाणें होता असें मानतां येत नाहीं. शिवाय 'नक्षत्र, नदी, वृक्ष यांचीं नांवें असलेल्या स्त्रीशीं विवाह करूं नये' ( मनु. ३.९ ) हा निषेध कां आहे हें मानवी बुद्धीस कळण्यासारखें नाहीं. अर्थात् असल्या अगम्य किंवा अलौकिक निषेधाचें अतिक्रमण करून झालेला विवाह असिद्ध ठरविला गेला पाहिजे. पण जुन्या काळापासून तशीं नांवें असलेल्या मुलीशीं लग्नें चालूं असून तीं निषिद्ध ठरविण्याचें कोणीं नुसतें मनांतहि घेतलेलें नाहीं. विवाहप्रकरणांतील या विधिनिषेधांची छाननी केल्यास, स्मृतिग्रंथांतील सर्वच विधिनिषेध पीनलकोडांतील विधिनिषेधांप्रमाणें कडक बंधनें घालून देणारे नसून, त्यांतील कित्येक सूचनावजा आहेत असें मानावें लागतें. तसें मानलें म्हणजे सर्व स्मृतिवचनें सारख्या प्रतिष्ठेचीं नसून त्यांची प्रतिष्ठा विचारानें ठरविली पाहिजे असें म्हणणें ओघासच येतें.

म्हणून खऱ्या जिज्ञासूनें आतां 'धर्माज्ञा, शास्त्रवचनें म्हणजे धर्मग्रंथांतील वचनें मानवी बुद्धीस कळून न येणाऱ्या गूढ प्रमेयांचें आकलन असलेल्या महनीय व्यक्तींनीं लिहून ठेवलेलीं आहेत, तीं मानवाचें भूत, भविष्य आणि वर्तमान अशा तिन्ही काळांतील कल्याण पुढें आणून लिहिलेलीं असल्यामुळें केवळ ऐहिक आणि तात्पुरता लाभ किंवा हानि एवढेंच पाहून तसल्या नियमांत ढवळाढवळ करणें योग्य नाहीं, अल्पज्ञ मानवास त्रिकालज्ञ ऋषिमुनींच्या परिपाटींत डोकें

---

२. अस्मिन् प्रकरणे यत्र नास्ति दृष्टगतः प्रतिषेधः...तदतिक्रमे विवाहस्वरूपानिर्वृत्तिरेव । यस्तु हीनक्रियादिप्रतिषेधः तस्य दृष्टदर्शनमूलत्वान्निवर्तते विवाहः, भवत्यसौ भार्या। —मेधातिथिः ३.११

सापिण्डा–समानगोत्रा–सप्रवरासु भार्यात्वमेव नोत्पद्यते । रोगिण्यादिषु तु भार्यात्वे उत्पन्नेऽपि दृष्टविरोध एव । —मिताक्षरा १.५३



अनुक्रमणिका






खुपसण्याचा अधिकार नाहीं ' हा परंपराभिमान्यांचा दावा पारखून पाहण्याची वेळ येऊन ठेपली आहे. हा दावा खरा मानल्यास कोणतीहि शास्त्राज्ञा खरी कीं खोटी हें ठरविण्याचा अधिकारच पामर मानवास नसतो असें मानावें लागेल. पण या लेखाच्या आरंभीं दिलेलीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे हें मानणें खोटें पडतें. शिवाय पूर्वमीमांसेसारख्या जुन्या शास्त्रांतच शास्त्रवचनांचा खरेखोटेपणा पारखण्याचे नियम दिलेले आहेत. सुधारकांनीं अज्ञानामुळें तर पुराणाभिमान्यांनीं स्वहितविरोधी म्हणून त्यांकडे लक्ष दिलें नसलें तरी खऱ्या जिज्ञासूनें त्यांचा परामर्श घेतला पाहिजे. म्हणून पूर्वमीमांसेच्या या संबंधांतील नियमांकडे वळूं.

### समूल कीं प्रक्षिप्त ?

एखादें शास्त्रवचन मूळ त्या त्या ग्रंथांतील आहे कीं नाहीं याचा शोध घेण्याचें तत्त्व जुन्या सर्व ग्रंथकारांनीं मान्य केलेलें आहे. मूळ ग्रंथांत जें वचन निर्विवादपणें दिसून येतें त्यास समूल म्हणजे प्रमाणभूत असें मानतात. याउलट कांहीं पोथ्यांत दिसून येणारें पण कांहींत दिसून न येणारें वचन प्रक्षिप्त म्हणजे मागाहून घुसडलेलें अर्थात् अप्रमाण मानतात. धर्मशास्त्रावरील निबंधग्रंथांत अशी चर्चा करून कित्येक शास्त्रवचनें अप्रमाण असल्याचें ठरविण्यांत आलेलें आहे. यावरून ' पदरीं पडलें आणि पवित्र झालें ' या म्हणीप्रमाणें ' कोणत्या तरी जुन्या ग्रंथांत सांपडलें आणि प्रमाण ठरलें ' असा आंधळा कारभार धर्मशास्त्रवचनांविषयीं चालूं शकत नाहीं हें दिसून येईल. धर्माज्ञाची पारख करण्याची ही पहिली कसोटी होय.

### वेदविरोधी वचनें अप्रमाण

धर्मग्रंथ दोन प्रकारचे आहेत. त्यांतील एका प्रकाराच्या ग्रंथास वेद किंवा श्रुति असें म्हणतात. आणि दुसऱ्यांस स्मृति असें नांव आहे. वेदांपेक्षां स्मृतिग्रंथ म्हणजे मनु-याज्ञवल्क्य इत्यादिकांचे मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति इत्यादि ग्रंथ कमी प्रतीचे मानण्यांत येतात. म्हणजे स्मृतिग्रंथांतील वेदविरोधी वचनें प्रमाण मानूं नयेत असा पूर्वमीमांसाशास्त्राचा सिद्धान्त आहे.[३] अर्थात् स्मृतिग्रंथांतील एखादें वचन योग्य आहे कीं नाहीं याची कसोटी तें वेदविरोधी आहे कीं नाहीं यावरून ठरविणेंच पूर्वमीमांसेस धरून आहे. केवळ तें त्या ग्रंथाच्या सर्व पोथ्यांत सांपडलें म्हणून अंधपणें प्रमाण मानलेंच पाहिजे असें ठरत नाहीं.

या कसोटीचा उपयोग करून कित्येक स्मृतींच्या आज्ञा अयोग्य ठरविण्याचा निर्भीड प्रयत्न पूर्वाचार्यांनीं केलेला दिसून येतो. स्त्रियांनीं संपत्तीसाठीं राबावें पण त्यांनीं उत्पन्न केलेल्या संपत्तीवर त्यांचा अधिकार नसावा, असें मत कित्येक जुन्या स्मृतींत आहे. भार्येचें धनावर स्वामित्व नसतें असें मनूनें स्पष्ट सांगितलें आहे.[४] पण हा मनूचा सिद्धान्त वेदविरुद्ध असल्यामुळें चुकीचा आहे, असें शबरस्वामीनें निर्भीडपणें विधान केलें आहे.[५]

### देशादिभेदानें आचारभेद अयोग्य

हिंदुसमाजांत देशभेदानें वेगवेगळे आचार पाळले जातात. आश्वलायन, आपस्तंब, हिरण्यकेशी इत्यादिकांनीं केलेले सूत्रग्रंथ सर्वांसाठीं नसून ठराविक कुटुंबांसाठींच वंशपरंपरेनें आहेत असें मानून त्याप्रमाणें वागण्याची पद्धत पडलेली आहे. देशभेद किंवा सूत्रभेद याप्रमाणें पाळावे कीं न पाळावें याविषयीं वेदांत कांहींच सांगितलेलें नाहीं. पण याच कारणास्तव ही रूढि अयोग्य असून भारताच्या कोणत्याहि भागांत सुरू असलेली शिष्टसंमत रीत सर्व भारतांत प्रान्तभेदाचा विचार न करतां पाळली

---

३. विरोधे त्वनपेक्षं स्यादसति ह्यनुमानम् । —जैमिनिसूत्रम् १. ३.३

४. भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः ।
यत् ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद्धनम् ॥ —मनु. ८. ४१६

५. भार्यादयो निर्धना इति स्मर्यमाणमपि निर्धनत्वमन्याय्यमेव । श्रुतिविरोधात् ।
—शाबरभाष्यम् ६.१.१४

गेली पाहिजे, एवढेंच नव्हे तर, गृह्यसूत्रें आणि धर्म-सूत्रें देखील विशिष्ट कुटुंबांसाठीं नसून तीं सर्व आर्यांसाठीं आहेत असें शबरस्वामी आणि कुमारिलभट्ट या महनीय आचार्यांनीं स्पष्ट सांगितलें आहे. आणि याचें कारण दाखवितांना असलें ( देशभेदानें किंवा सूत्रभेदानें आचारभेद पाळण्याचें ) धोरण वेदांत सांगितलेलें नाहीं असें त्यांनीं विधान केलेलें आहे.[६] या उदाहरणावरून वेदांत स्पष्ट विरोधी विधान नसलें, तथापि वेदाच्या एकूण धोरणाविरुद्ध जरी एखादें स्मृतिवचन असलें, तरी तें अयोग्य ठरविलें गेलें पाहिजे असा प्राचीन आचार्यांचा कटाक्ष असल्याचें दिसून येतें. धर्माज्ञा पारखण्याची ही दुसरी कसोटी होय.

## लोभद्वेषादिमूलक आज्ञा अप्रमाण

एखादें स्मृतींतील विधान वेदविरुद्ध नसलें पण लोभादिकांमुळें तसलें विधान केलें आहे असें वाटत असेल, तर तसलीं स्मृतिवचनें वेदमूलक म्हणजेच प्रमाण मानूं नयेत असा दंडक पूर्वमीमांसेनें घालून दिलेला आहे. शबरस्वामीनें अशा लोभादिमूलक स्मृतींचीं अनेक उदाहरणें आपल्या ग्रंथांत दिलेलीं दिसून येतात. ' वैसर्जन होमांतील कापड अध्वर्यूनें घ्यावें ' असें एक स्मृतिवचन असून, दुसरें ' यूप-हस्ति नांवाचें यूपास गुंडाळलेलें कापड ( ऋत्विजास ) देऊन टाकावें ' अशा अर्थाचें वचन आहे. हीं दोन्ही वचनें 'वेदमूलक नसून लोभानें कोणी तसलें कापड घेतल्यामुळें तशी रूढि आहे, धर्म आहे असें मानून कोण्या स्मृतिकारानें लिहिलें ' असें या दोन्ही स्मृतिवचनांचें मूळ शबरस्वामीनें दिलें आहे.[७] द्वेषमूलक स्मृतिवचनांचें उदाहरण जुन्या ग्रंथकारांनीं दिलेलें नसलें तरी शूद्र किंवा महिला याविषयीं जे अनुदारपणा दाखविणारे नियम स्मृतींत दिसतात, ते द्वेषमूलक स्मृतींचीं उदाहरणें म्हणून मानतां येतील. अशा रीतीनें एखाद्या नियमाची लौकिक म्हणजे ऐहिक दृष्टीनें उपपत्ति लागत असेल तर तशाची अलौकिक किंवा पारलौकिक उपपत्ति लावणें योग्य नव्हे, असा या संबंधांत सर्व जुन्या शास्त्रकारांचा दण्डक आहे. तो ध्यानांत घेतला म्हणजे धर्माज्ञा पारखण्याची तिसरी कसोटी कळून येईल.

## धर्माज्ञा बाजूस सारण्याची धर्माज्ञा

एखादी धर्मशास्त्रोक्त क्रिया दुःखदायक किंवा लोकमताविरुद्ध दिसून आल्यास तिचा त्याग करावा, असें मनुयाज्ञवल्क्यांनीं सांगून ठेवलें आहे.[८] त्यावरून पुष्कळच बोध घेतां येईल. नियोगपद्धति, गोवधाची चाल इत्यादि प्रकार वेद आणि स्मृति-ग्रंथांत प्रतिपादिले आहेत. परंतु हे दोन्ही प्रकार जेव्हां जनतेला आवडेनासे झाले तेव्हां त्यांचें धर्मत्व नष्ट होऊन, ते ते प्रकार एका वेळीं धर्माज्ञेस धरून असतांहि अधर्म मानले जाऊं लागले. यावरून जनमत जर विरोधी असेल तर धर्माज्ञाहि झुगारून देतां येते हें सिद्ध होतें. धर्माज्ञा पारखण्याची ही चौथी कसोटी होय.

हें विवेचन गोवधादिकांपुरतेंच नाहीं. जुन्या पिढींतील धार्मिक म्हणविणारांनीं अव्हेरिलेल्या ज्या धर्माज्ञा मागें दिलेल्या आहेत त्यांवरून त्यांची

---

६. अपि वा सर्वधर्मः स्यात् तन्न्यायत्वात् विधानस्य। --( जैमिनिसूत्रम् १.३.१६ ). तस्मात् सर्वधर्मता विधेर्न्यायया । कुतः ? पदार्थाः कर्तव्या इति प्रमाणमस्ति । व्यवस्थायां तु न किंचित् प्रमाणमस्ति । --( शाबरभाष्यम् १. ३. १६ ). तस्मात् सर्वाधिकारन्यायत्वात् विधानस्य व्यवस्थित-देशाचारगृह्यधर्मसूत्रनिबद्धधर्माणामपि सर्वधर्मत्वम् । --( तन्त्रवार्तिकम् १.३.१६ ).

७. हेतुदर्शनाच्च । --( जैमिनिसूत्रम् १.३.४ ). ' वैसर्जनहोमीयं वासोऽध्वर्युर्गृह्णाति ', ' यूपहस्तिनो दानमाचरन्ति ' इति । ...अत्रान्यन्मूलम् । लोभादाचरितवन्तः केचित् तत एषा स्मृतिः उपपन्नतरं चैतत् वैदिकवचनकल्पनात् । --( शाबरभाष्यम् १.२.४ ).

८. धर्मं चाप्यसुखोदर्कं लोकविक्रुष्टमेव च ( परित्यजेत् ) । --( मनु. ४.१७६ ).
अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्न तु । --( याज्ञवल्क्य. १.१५६ ).










संख्या किती मोठी आहे हें सहज दिसून येईल. आणि त्या प्रकाराचें कारणहि आतां उघड होईल. गाईसारख्या उपयुक्त प्राण्याची हिंसा करून यज्ञ करणें पटण्यासारखें नाहीं. त्याचप्रमाणें स्वस्त आणि सुलभ असा कांदा बाराबारा महिने वर्ज्य करणें सोयीचें नव्हे, म्हणून त्याचा निषेध चातुर्मास्या-पुरता मर्यादित ठेवून इतर आठ महिन्यांत तो खाण्यास हरकत नाहीं (--त्यांतहि एकादशीसारखे वर्ज्य दिवस आहेतच--) असा नवा दण्डक तयार होणें क्रमप्राप्त होतें. क्षत्रियानें १२ दिवस, वैश्यानें १५ दिवस आणि शूद्रानें महिनाभर सुतक धरावें असें मन्वादिकांनीं सांगितलें आहे (मनु. ५·८३). पण व्यवहारांत सर्व दहा दिवसांचेंच सुतक धरतात. शूद्रानें एक महिनाभर सुतक धरलें तर एवढ्या दीर्घ कालापर्यंत होणारी कामकाजाची गैरसोय लक्षांत घेऊन बहुधा ही प्रदीर्घ मर्यादा प्रथम-पासूनच दूर सारली गेली असली पाहिजे. औषधें देणाऱ्या वैद्याला निंद्य मानावें असें वेदापासून अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें असून, त्याचें अन्न खाऊं नये अशा अर्थाच्या स्पष्ट शास्त्राज्ञा[९] आहेत. पण त्या दुःखदायक म्हणूनच कीं काय कधींच जनतेनें आणि पुढाऱ्यांनीं दूर सारलेल्या आहेत. यावरून शास्त्राज्ञा किंवा धर्माज्ञा जरी वेदप्रतिपादित असल्या तरी तेवढ्यावरूनच त्या आचरण्यास योग्य ठरतात असें मानणें प्राचीन परंपरेस संमत नाहीं, हें दिसून येईल.

### महर्षींचा यज्ञीय-हिंसाविरोध

या विषयांत एक पुराणप्रसिद्ध महत्त्वाचें उदाहरण पाहण्यासारखें आहे. वायुपुराणामध्यें इंद्राच्या यज्ञांत पशुवध चालू असतां महर्षींनीं त्याचा निषेध करून 'तूं धर्म नष्ट करणारा अधर्म करीत आहेस. हा धर्म नव्हे, हा अधर्म आहे; कारण हिंसा धर्म होऊं शकत नाहीं' असें आपलें स्पष्ट मत सांगितलें आहे.[१०] यावरून वेदोक्त धार्मिक विधानें देखील अहिंसादि धर्मतत्त्वांस धरून असतील तरच तीं प्रमाण मानावीत याची पूर्वीं चाल होती हें दिसून येतें. या वादांत वेदांतील वचनें दाखवून यज्ञीय हिंसेचें समर्थन करण्याचा इन्द्राकडून प्रयत्न झाला. परंतु अहिंसा या धर्मतत्त्वाविरुद्ध असल्यामुळें तीं वचनें प्रमाण मानूं नयेत, असा महर्षींनीं पक्ष मांडला होता हें ध्यानांत घेतलें, म्हणजे वेदवचनांस केवळ तीं वेदवचनें म्हणून मान देणें योग्य नसून त्यांसहि धर्मतत्त्वांची कसोटी लावण्याची एका काळीं प्रथा होती, हें कळून येतें. धर्माज्ञा पारखण्याची ही पांचवी कसोटी होय. केवळ एखादा विधिनिषेध एखाद्या ग्रंथांत दिसून येतांच तो प्रमाण ठरत नसून त्याला याप्रमाणें पांच कसोट्यांवर घासून पाहावें लागतें, हें आज जुन्यांच्या किंवा नव्यांच्याहि गांवीं नसलें तरी एका काळीं ही पद्धत आपल्याकडे रूढ होती, हें वरील पुराव्यावरून दिसून येईल. महाभारतादि ग्रंथांत 'धर्मनिश्चयार्थ बुद्धीचा आश्रय करावा, नुसतीं शास्त्रवचनें पाहून भागवूं नये' असें सांगणारीं वचनें आढळतात.[११] त्यांचा अभिप्राय हाच आहे.

### शास्त्रानें दिलेल्या सवलती काढून घेतल्या

वेदप्रतिपादित पशुहिंसेस महर्षींनीं हरताळ फासला, त्याचप्रमाणें त्यानंतरच्या कित्येकांनीं विधवा-विवाह, घटस्फोट यांस असलेल्या सवलती काढून टाकल्या. 'बाळंत झालेल्या ब्राह्मण स्त्रीनें आठ वर्षें, पण नववधूनें केवळ चार वर्षेंच परागंदा नवऱ्याची

९. तस्मात् ब्राह्मणेन भेषजं न कार्यम्। अपूतो ह्येषोऽमेध्यो यो भिषक्॥ (तै. सं. ३.४.९.२) चिकित्सकस्य मृगयोः...सूतिकान्नं च न भुञ्जीत। --(मनु. ४.२१२).

१०. अधर्मो धर्मघाताय प्रारब्धः पशुभिस्त्वया।
नायं धर्मो ह्यधर्मोऽयं न हिंसा धर्म उच्यते। --(वायुपुराणम् ५७.९८-९९).

११. तस्मात् कौंतेय विदुषा धर्माधर्मविनिश्चये। बुद्धिमास्थाय लोकेऽस्मिन् वर्तितव्यं कृतात्मना॥ --(महाभारत ११.१४१.१०२). युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि। अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं पद्मजन्मना॥ --(योगवासिष्ठ २.१८.३).










प्रतीक्षा करून, तो त्या मुदतींत परत न आल्यास दुसरा पति करावा' असें नारदानें (नारद १५.९८) आणि वसिष्ठानें स्पष्ट सांगितलें आहे. यावरून त्रैवर्णिक स्त्रियांस घटस्फोटाची सवलत पूर्वी होती हें दिसून येतें. पण ती ज्यांस समाजघातक वाटली त्यांनीं नवे निर्बंध उत्पन्न केले. एखाद्यानें संन्यास घेतल्यावर, त्याला वाटल्यास फिरून गृहस्थाश्रम पूर्वी स्वीकारतां येत असे. त्याप्रमाणें कित्येक संन्याश्यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारल्याचें शांतिपर्वाच्या ११ व्या अध्यायांत सांगितलें आहे. सुप्रसिद्ध मिताक्षरा ग्रंथांत (३.२८०) 'एखाद्यानें संन्यास घेतल्यावर फिरून गृहस्थाश्रमी होण्याची इच्छा केली तर सहा महिन्यांचें कृच्छ्र या नांवाचें प्रायश्चित्त करून त्याला गृहस्थाश्रम स्वीकारतां येईल' असें स्पष्ट म्हटलें आहे. असें असूनहि ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत यांस त्याबद्दल पैठणक्षेत्रस्थ विद्वानांनीं देहान्त शासन सांगितलें होतें. हें योग्य झालें किंवा नाहीं याचा येथें विचार कर्तव्य नाहीं. असलेलीं शास्त्रोक्त बंधनें काढून टाकणें आणि शास्त्रोक्त सवलती बाजूस सारून नवीं बंधनें घालणें असे दोन्ही प्रकार प्राचीन काळापासून ज्ञानेश्वरकाळापर्यंत चालू होते एवढाच मुद्दा येथें सिद्ध करावयाचा आहे. तो ध्यानांत घेतल्यास धर्माज्ञा अंधपणें प्रमाण मानण्याची सध्यांची परंपरा योग्य नसून धर्माज्ञांचें या लेखांतील पांच कसोट्या लावून मूल्यमापन करण्याचीच पद्धत जुन्या काळीं भारतांत रूढ होती हें दिसून येईल.

### धर्माज्ञांचें वर्गीकरण

धर्माज्ञांचें मूल्यमापन करतांना, वरील कसोट्यांबरोबरच त्यांचें वर्गीकरणहि ध्यानांत घेतलें गेलें पाहिजे. मानवी जीवनाच्या सर्व पैलूंविषयींचे नियम आपल्या धर्मग्रंथांत सरमिसळ दिसून येतात. यामुळें धर्म (religion), नीति (morality), आरोग्य (health), शिष्टाचार (etiquette) आणि कायदा (law) या सर्वांचें त्यांत मिश्रण झालेलें आहे.[१२] त्यांचें वर्गीकरण केल्याशिवाय त्या त्या विषयांतील विधिनिषेधांचें मूल्य ठरविणें अयोग्य होईल. म्हणून धर्माज्ञांचे विषय पाहून त्यांचें वर्गीकरण प्रथम केलें पाहिजे आणि मगच त्यांचें मूल्य ठरविलें पाहिजे. या लेखांत दिलेल्या धर्माज्ञा पारखण्याच्या पांच कसोट्या आणि हें पांच प्रकारचें वर्गीकरण करून धर्माज्ञांचें मूल्य ठरविण्याची पद्धत पाडली तर 'आम्ही धर्माज्ञांचा विचार करीत नाहीं,' 'या विषयांत धर्मशास्त्र काय म्हणतें हें पाहण्याचें कारण नाहीं' असें म्हणून या लेखाच्या आरंभीं दर्शविल्याप्रमाणें बहुजनसमाजाच्या मनांत नव्या सुधारणेविषयीं जी साशंकता किंवा अनादर पसरविण्याची चूक सुधारकांकडून अजाणतां होत असते ती होण्याचें टळेल आणि जुन्यांस त्या त्या वचनांचें तात्त्विक अधिष्ठान पाहावें लागेल.

---

१२. हे पांच विषय कळून यावे म्हणून मनुस्मृतींतील त्यांचीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत: आचमन करतांना प्रथम तीनदां पाणी पिऊन नंतर दोनदां तोंड धुवावें इत्यादि सांगणारा 'त्रिराचामेदपः पूर्वं द्विः प्रमृज्यात्ततो मुखम्।' (२.६०) हा श्लोक धर्माचार सांगणारा आहे.—'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम्' (४.१३८) यामध्यें खरें आणि गोड बोलावें हा नीतिनियम सांगितला आहे.—'अनारोग्यमनायुष्यं...अतिभोजनं परिवर्जयेत्।' (२.५७) यांत अति खाऊं नये हा आरोग्यनियम सांगितलेला आहे.—'नापृष्टः कस्यचिद् ब्रूयात्।' (२.११०) म्हणजे 'विचारल्याशिवाय सांगूं नये' असा शिष्टाचार होय.— 'त्वग्भेदकः शतं दण्ड्यो लोहितस्य च दर्शकः।' (८.२८४) म्हणजे 'चामडी फुटेल किंवा रक्त निघेल असें मारणारास शंभर दण्ड करावा' या ठिकाणीं राजानें अपराध्यास करावयाच्या शिक्षेचा उल्लेख आहे.— हीं पांच प्रकारचीं वचनें जरी आज्ञारूप असलीं आणि एकाच धर्मग्रंथांत तीं असल्यामुळें जरी त्यांस 'धर्माज्ञा' असें म्हटलें जातें तरी त्यांचें मूल्य सारखेंच मानणें अयोग्य ठरेल. म्हणून कसोट्यांप्रमाणेंच हें वर्गीकरणहि महत्त्वाचें होय.

ताभीळनाडमधील भूदान-यात्रेच्या निमित्तानें एक निरीक्षण : श्री. श्री. रा. टिकेकर

# दक्षिण-भारत-संस्कृतीचें ओझरतें दर्शन

मुलुखगिरीसाठीं मराठ्यांना निरनिराळ्या प्रांतांत जावें लागलें व तेथील लोकांशीं त्यांचे भलेबुरे संबंधहि जडले. असल्या 'अर्थोत्पादक' संपर्का-मुळें इतरहि अदृष्ट अशी पुष्कळ देव-घेव उभय जनतेंत झाली असली पाहिजे हें उघड आहे. बंगाली माता अजूनहि 'बोरगी' (=बारगीर) आल्याची भीति आपल्या रडणाऱ्या मुलांना घालतात; तर बंगाली 'महाराष्ट्र-पुराणां'त मराठ्यांनीं केलेल्या पाशवी अत्याचारांचें वर्णन आढळतें. 'भूषण' सारखा कवि म्हणतो :

'काशीहुकी कला जाती—
मथुरा मसीद होती
जब शिवाजी न होत
तब सुन्नत होत सबकी.'

म्हणजे "काशीची कळा पार गेली असती; मथुरेंत मशिदी झाल्या असत्या; शिवभूप (शिवाजी) जन्मले नसते तर सर्वांची 'सुंता' झाली असती" (हिंदु नाममात्रहि उरले नसते हा भावार्थ). छत्रसालानें बाजीराव पेशव्यास गौरवपर पत्र लिहून स्वतःकडे 'मकरग्रासित गजेंद्र' पदवी घेतली आणि त्या गजेंद्राचा मोक्ष करणारा पेशवा प्रत्यक्ष भगवान् विष्णु असें सूचित केलें. लढवय्या राजपुतांनीं मराठी भाषेची किंमत 'आणेवारी'त सांगितली :

'अगर मगर के सोले आने
इकडे तिकडे बार'

'अगर मगर' हे शब्द असणारी फारसी सोळा आणे किंमतीची तर 'इकडे तिकडे' या शब्दांची मराठी बारा आणे किंमतीची त्यांनीं ठरविली. या-नंतरचा क्रम चार आणेवाल्या व चार पैसेवाल्या भाषांचा आहे. त्यांचीं नांवें सांगून कुणालाहि हिणवा कशाला !

महाराष्ट्रीय कारभारी निरनिराळ्या प्रांतांत असल्याची एक पक्की खूण पाहावयास मिळते. त्या त्या ठिकाणचीं 'दप्तरें' (सरकारी हिशेब, जमाखर्च) मोडींत आढळतात. मदुरा, तंजावर, पुदुकोटाई, म्हैसूर अशा किती तरी ठिकाणचीं दप्तरें मोडींत असल्याचा पुरावा उपलब्ध आहे. उत्तरेकडे आमचे सरदार पेशव्यांनीं पाठविले. गुजरातेंत गायकवाड, माळव्यांत होळकर, ग्वाल्हेरीस शिंदे. नागपूर-भोसल्यांनीं बंगाल-ओरिसा इकडे अंमल गाजविला. दक्षिणेकडे मात्र छत्रपतींच्या पेशव्यांचे सरदार नेमले नव्हते. प्रत्यक्ष छत्रपतींची गादीच तंजावरीं होती. आणि तत्पूर्वीं बंगळूरीं शहाजी राजे यांचा दरबार होता. दक्षिण प्रांताशीं मराठ्यांचें असें निकटचें नातें होतें ही गोष्ट कोण नाकबूल करील ? छत्रपतींचे वडील काय किंवा बंधु काय, मुलुखगिरीसाठीं इकडे आले नव्हते. जे आले ते स्थाईकच झाले. हा मुख्य फरक पाहातां दक्षिणेकडील द्राविडभाषीयांशीं मराठीचा संबंध प्रेमाचा होता. उत्तरेकडे आलेली आक्रमकता त्यांत नव्हती. त्यामुळें सांस्कृतिक देवघेव आपसूक झाली, बिनतक्रार झाली. तंजावरची सरस्वती-महाल लायब्ररीच पाहा. ही राजे सरफोजी भोसले यांची. तींत संस्कृत, तामीळ, तेलगु, मल्याळी, कानडी व मराठी या सर्व भाषांतील जुनीं हस्तलिखितें आहेत. तीं हळूहळू छापून माफक किंमतीला वाचकांना मिळत आहेत. अशी कामगिरी बडोद्याच्या








श्री. सयाजीरावांनाच बजावतां आली. होळकर व शिंदे या बाबतींत कोरडे राहिलेले दिसतात.

छत्रपतींचें घरच तंजावर असल्यानें इकडील सांस्कृतिक जीवनाशीं त्यांचा आज तीनशें-साडेतीनशें वर्षे संबंध आला. बडोदा, इंदूर, ग्वालेर व नागपूर येथील सरदार-घराणीं त्या मानानें अलिकडचीं आहेत. तामीळ प्रदेशांत 'कथा-कालक्षेपम्' हा हरिदासी कथेचा प्रकार मराठीकडून उसनवार नेलेला आहे. कित्येक अभंग, कित्येक भजनें व पदें शुद्ध मराठी असून तीं तामिळी जनतेनें 'आपनाविलीं' आहेत. तामिळी प्रदेशांतील रेडिओवरहि तीं ऐकूं येतात. तीं कोणत्या भाषेंतलीं आहेत हें कदाचित् त्यांना ठाऊक नसावें. तामीळ लिपींत हीं आज बरीच वर्षे अशीं मराठीं भक्तिगीतें छापून मुखोद्गत करण्यासाठीं प्रसार पावलीं आहेत.

हा प्रेमळ संबंध कायम राहण्याजोगी परिस्थिति कोणती होती ? आजहि तामीळ-नाडमध्यें अनेक मराठी कुटुंबें स्थायिक झालीं आहेत. त्यांनीं तामीळ भाषा पत्करली आहे आणि आपल्या परीनें तामीळ-मराठी सलोखा ते वाढवीत आहेत. निव्वळ मराठी, महाराष्ट्रीय कुटुंबांचीच ही कामगिरी म्हणतां येणार नाहीं. 'सौराष्ट्र ब्राह्मण' म्हणून एक छोटीशी जमात बव्हंशीं मदुरेच्या आसपास स्थायिक झालेली असून तिचें महाराष्ट्राशीं जवळचें नातें सांगतां येतें. त्या लोकांनींहि तामीळ भाषा व लिपि अंगिकारली असून, आपण तामीळनाडमध्यें समरस झाल्याची खात्री पटविली आहे.

सौराष्ट्र ब्राह्मणांचा थोडा प्राचीन इतिहास आहे. मंदसौरशिलालेखांत (६ वी शताब्दी) ज्या तंतुवायश्रेणीचा उल्लेख आहे, ते हेच लोक असावेत असा ज्ञात्यांचा कयास आहे. देवगिरी, हैदराबाद या मार्गानें ते मदुरेस पोंचले व तेथें 'स्थायिक' झाले. त्यांच्या भाषेंत जुने मराठी व गुजराती शब्द पुष्कळ सांपडतात. पण त्यांच्या संघटनेची मौज अशी कीं, मद्रास सरकारशीं त्यांनीं दोन (परस्परविरोधी) मागण्या निरनिराळ्या वेळीं केल्या. मागसलेल्या जातींच्या शिक्षणासाठीं अधिक द्रव्य मिळतें म्हणून 'सौराष्ट्र ब्राह्मण' मागसलेले लोक समजावे. त्यांचें 'ब्राह्मणत्व' नांवाचें आहे. वृत्तीनें व पेशानें (त्यांचा व्यवसाय अद्यापहि 'तंतुवाय' विणकरीचा आहे) ते मागसलेले आहेत असें दाखवून सरकारकडून त्यांनीं एकदां आपला 'समावेश' त्या वर्गात करून घेतला. पुढें शिरगणतीच्या वेळीं आपलें वर्गीकरण 'ब्राह्मण' अशा पुढारलेल्या जातींत व्हावें अशीहि मागणी त्यांनीं केली. ही ओघाओघानें आलेली सौराष्ट्र ब्राह्मणांची पूर्वपीठिका झाली.

तामीळ वाङ्मय फार प्राचीन आहे. ती भाषा द्राविडवंशीय आहे; तरी रामायण-महाभारत वगैरे ग्रंथ ताडपत्रावर 'कोरून' लिहून त्यांनीं जतन केले आहेत. संस्कृत वाङ्मयांतील ठेवा अखिल-भारतीयांचा समान हक्काचा आहे. पारमार्थिक, वेदान्ती वाङ्मय, धर्मशास्त्र, पुराणें, ललितकला, गणित, वैद्यक, ज्योतिषादिशास्त्रें हीं भारतवासीयांस एकसारखींच उपलब्ध असल्यानें बाह्य भेद कितीहि असले तरी सांस्कृतिक ऐक्य साधलें आहे. तें वर-वर पाहाणाराला दिसत नाहीं. किंबहुना वंश-शास्त्राचा, भाषाशास्त्राचा व कित्येक रूढींचा आधार घेऊन 'दाक्षिणात्य' द्राविडी जनता इतर भारतीयांहून अगदीं निराळी आहे, असें भासविण्याचा उपद्व्याप कित्येक करतात. परंतु धर्म-ग्रंथांचें, पुराणांचें व पारमार्थिक वाङ्मयाचें ऐक्य स्पष्ट असल्यानें वरवरच्या विविधतेनें भुलून जाऊं नये.

सांस्कृतिक ऐक्य असलें तरी दैवतांच्या प्रादेशिक स्वरूपांत थोडा फरक झाला आहे आणि तो फरक मोठा मनोरंजक आहे. पहिला महत्त्वाचा फरक शंकर-पार्वती यांच्या मुलांत आहे. स्कंद व गणेश या दोन्ही भावांच्या गुणांत व पराक्रमांत आमच्या दृष्टीनें तामीळप्रांतीयांनीं थोडा फेरबदल केला. आम्ही गणेशाला विवाहित समजतों आणि 'कार्तिकस्वामीचा अवतार' असा वाक्प्रचार होण्यापर्यंत स्कंदाच्या ब्रह्मचर्याची ख्याति आम्हीं नेली. त्याच्या देवळांत स्त्रियांना बंदी असते. स्त्रियाहि त्याच्यावर रुष्ट झालेल्या दिसतात. अजून या रुढीविरुद्ध 'बायकांचें बंड' उभारल्याचें ऐकिवांत नाहीं. पण इकडे बघावें तो सारा प्रकार उलटा ! कार्तिकेयाला एक नव्हे दोन बायका









आणि 'गणोबा' अविवाहित ! फार काय, कुणी मुलगा 'घोड्या' एवढा वाढला अन् त्याचें लग्न झालें नसलें, म्हणजे त्याला 'गणोबा' म्हणण्याचा रिवाज या लोकांचा आहे. कार्तिकेया-च्या देवळांत इकडे स्त्रियांना काय पण कुणालाच बंदी नाहीं. विशेष म्हणजे कार्तिकेयाला 'वेणीदान' करण्याची स्त्री-पुरुषांची चाल आहे.

विनायक 'गणोबा' कां राहिला या-बद्दलची कथा इकडील भागांत रूढ आहे ती अशी : आपला मुलगा 'उपवधू' झाल्यावर पार्वतीनें मोठ्या लडिवाळपणें बाळाला विचारलें, "बाळा लंबोदरा, तुला कशी मुलगी हवी तें सांग, म्हणजे आम्ही शोधांत राहूं. आतां तुझें लग्न करायचं ना ?" वक्रतुंडाचा जबाब तयार होता. त्यानं म्हटलं, "आई. तुला सून हवी तर ती तुझ्या-सारखी सुंदर, देखणी आणि चतुर असावी. तुझ्या-पेक्षां 'कांकणभर' सरस असलेली पत्करेन मी एक वेळ, पण तुझ्यापेक्षां कुठल्याहि प्रकारें ती कमी असतां कामा नये."

आपल्या आवडत्या मुलाचें हें बोलणें हिमनग-दुहितेला रुचलें नाहीं. तिला त्याचा रागच आला म्हणाना ! ती 'गरम' झाली आणि तिनें संतापाच्या भरांत म्हटलें, "बस बरं, बाळ, इथं तुला हवी तशी मुलगी कुठं दिसते का त्याची वाट पाहात." असें म्हणतांना तिनं जागा दाख-विली पाणवठ्याजवळची. म्हणून तामीळनाडमध्यें गांवाबाहेर, वेशीजवळ, पाणवठ्यापाशीं 'गणोबा' बसलेले असतात. त्यांना सहसा देऊळ बांधलेलें नसतें. जवळ दोनतीन 'नाग' (दगडाचे) फडा उभारून 'बसलेले' असतात. अजूनहि 'गणोबा'ला हवी तशी 'बायको' आढळली नाहीं ! शंकरालाच तेवढा क्रोध चढतो असें नव्हे. प्रत्यक्ष आईनें देखील मुलाला असा शाप द्यावा, ही क्रोधाचीच खूण होय.

कलागती लावण्यांत नारदमुनींचा हातखंडाच म्हणावा. त्यांनीं 'चूष' म्हणून शंकर-पार्वतींत भांडण न लावतां स्कंद-गणेश या भावाभावांत भांडण लावण्याची एक युक्ति काढली. एक सुंदर मधुर फळ घेऊन ते उमा-महादेवांच्या दर्शनाला गेले आणि सहज त्यांनीं विचारलं : "मुलं कुठं दिसत नाहींत तीं ?"

षडानन काय किंवा गजानन काय, बालपणीं ते दोघेहि इतर मुलांप्रमाणें हूड, भांडखोर, उतावळे होते. त्यांनीं नारदाच्या हातांतील फळाची मागणी सारख्याच आग्रहानें केली. "मला एकट्यालाच तें फळ पाहिजे" असा दोघांचाहि हट्ट ! झालं, नारदाचं काम झालं. नारदांनीं लगेच म्हटलं, "हें पाहा, इथं ठेवलंय हें फळ. जो कुणी पृथ्वीप्रदक्षिणा करून आधीं येऊन 'शिवा'ला शिवेल, त्याला एकट्याला सबंध फळ मिळेल."

एवढें बोलणें ऐकतांच स्कंद निघाला भुर्रकन् मोरावरून पृथ्वीप्रदक्षिणेसाठीं. गजानन आपलें पोट सावरून उंदीर कुठं आहे तो बघूं लागला. त्यानें विचार केला कीं, "आपल्याला कांहीं आपल्या 'दादा'शीं स्पर्धा करतां यायची नाहीं; बोलून चालून तो मोठा; शिवाय त्याला एक नाहीं, दोन नाहीं, पांच डोकीं आपल्यापेक्षां जास्त. तरी एका डोक्यांतली अक्कल चालवूनच आपल्या 'दादा'-ची जिरवूं या."

शिव-पार्वती आपल्या मुलांचं कौतुक पाहात होतीं. बाळ विनायक तिथल्या तिथंच कां घुटमळत उभा आहे, हें त्यांना कळेना. त्यानें निदान प्रयत्न तरी करून पाहावा अशी त्यांची अपेक्षा. पण लगेच तो मातापित्यांना प्रदक्षिणा घालून हात पुढं करून म्हणाला, "फळ माझं—फळ माऽझं, मीं पहिल्यांदा पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली !"

शंकरालाहि कोडें पडलें कीं, हें असं कसं म्हणतो हा लंबोदर ? ते म्हणाले, "अरे, तूं इथल्या इथंच फिरलास आणि पृथ्वीप्रदक्षिणा केव्हां पुरी केलीस ?"

बाळ गणपति हंसून म्हणाला, "बाबा, अहो तुम्हांला अन् आईला प्रदक्षिणा घातल्यावर पृथ्वी-प्रदक्षिणा होत नाहीं का ? सांगा बरं, तुमच्या-व्यतिरिक्त पृथ्वी म्हणजे काय आहे ?"

"पुत्रात् इच्छेत् पराभवम्" या अंतःस्थ समाधानानें शिव-पार्वतींनीं गजाननाची पाठ थोपटली आणि त्याला दिलं तें फळ. पण दादा आल्याशिवाय, त्याला 'ढुक् ढुक्' केल्या-

शिवाय तें खाण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं, म्हणून गणेश वाट पाहात राहिला. एवढ्यांत मयूरारूढ षण्मुख आले पृथ्वीप्रदक्षिणा पुरी करून. पण फळ गजाननाच्या हातांत पाहातांच संतापले. औरस हक्कानें थोडा तरी राग आलाच होता त्यांच्या वांट्यास. त्यांनीं तसेंच मोराला पिटाळलें. गणेशानें पैज कशी जिंकली ही चौकशीसुद्धां करण्यास ते थांबले नाहींत. आकाशमार्गानें जात असतां स्कंदमहाशयांना एक छानशी जागा दिसली. चांगली उंचहि होती ती. इथंच मुक्काम ठोकणार असें ठरवून स्वारीनं दिलं ठाण तिथं.

पार्वती, किती झालं तरी आईच ती. कार्तिकेय पहिला मुलगा. तेव्हां तो असा रुसून गेलेला तिला कसा पाहवेल? ती त्याच्या मागोमाग गेली. त्याच्याशीं बोलून त्याची समजूत पाडण्याचा प्रयत्न तिनें पुष्कळ केला. 'अरे, तूं स्वतःच 'फळ' नव्हेस का? दुसऱ्या छोट्या फळासाठीं तुझ्यासारख्या दादानं हट्ट करूं नये.' अशी समजूत पाडण्यासाठीं 'पळ नी' 'पळ नी' असं ती तामीळमध्यें बोलत होती. त्याचा अर्थ 'फल तूंच', 'फल तूंच' असा होतो. म्हणून पलनी या गांवाजवळच्या उंच पहाडावर कार्तिकेयाचें प्रचंड मंदिर आहे. नांवाची व्युत्पत्ति व येथें देऊळ असण्याचें प्रयोजन असें आतां सांगितलें. तामीळ प्रांतांत डोंगरावर जिकडे तिकडे बहुधा सुब्रह्मण्याचींच देवळें असतात. स्कंद, कार्तिकेय, षडानन इत्यादि अनेक नांवें देवसेनानीला आहेत. पण त्याचें 'सुब्रह्मण्यम्' असेंच नांव या प्रांतीं कां पडलें, तें मात्र कळत नाहीं.

चतुरानन ब्रह्मदेवाच्या दिढीनें तोंडें आहेत म्हणून तर षडाननाला दाक्षिणात्यांनीं 'सु-ब्रह्मण्यम्' ठरविलें नसेल? त्यांच्या नांवांतली एक खास बाब अशी कीं तें नांव 'अमन्त' अगर 'अनन्त' (अन्+अंन्त) असतें. साधा राम न म्हणतां ते रामन् म्हणतील. त्याचप्रमाणें गोपालन्, कृष्णन्, गोविन्दन्, जगन्नाथन्, व्यंकटेशन्, नटेशन्, केशवन्, भारतन्, राधाकृष्णन्, अनंतशयनम्, सदाशिवम्, सुन्दरम्....हाहि फरक कां व्हावा समजत नाहीं. शंकर-पार्वती, गणेश, स्कंद यांना कांहीं कांहीं नवीं नांवेंहि दिलीं आहेत. अभिरामी, मीनाक्षी, विशालाक्षी, कामाक्षी हीं पार्वतीचीं नांवें व त्याचे स्थानिक भाषेंतील पर्याय (अयंकर-कण्णी मीनाक्षी) अशांची यादी किती तरी मोठी होईल. जोडनांवेंहि कित्येक आढळतात. 'गणपति-सुब्रह्मण्यम्' हें एका माणसाचें नांव आहे. त्याचप्रमाणें 'हरिहर-सुब्रह्मण्यम्', 'मीनाक्षी-सुन्दरम्' असेहि मोठमोठे समास केलेले आढळतात.

तामीळ नांवांच्या गोष्टी चालल्या आहेत, तेव्हां त्या भाषेबद्दल थोडें लिहिणें जरूर आहे. संस्कृतपेक्षांहि ती पुराणी आहे असा अभिमानपूर्वक उल्लेख करणारे अनेक विद्वान् आहेत; पण एवढें खरें कीं, तींत व्यंजनें कमी आहेत. 'व्यंजन'-पदार्थांची विलक्षण आवड असणाऱ्या या बांधवांच्या भाषेंत व्यंजनें कमी कां असावीं? १६ स्वर आणि ३६ व्यंजनें अशी आपल्या (देवनागरी) लिपींत व्यवस्था आहे. तर तामीळमध्यें १२ स्वर आणि फक्त २३ व्यंजनें यांवर काम भागतें. "क-च-ट-त-प" ह्या पांच वर्गांत आपण प्रत्येकीं पांच व्यंजनें आहेत असें समजतों; पण तामीळ बंधु मात्र प्रत्येकीं दोनच व्यंजनें मानतात. म्हणजे 'क' वर्गांत क व ङ. 'च' वर्गांत च व ञ...पांच वर्गांत मिळून आपल्याकडील २५ व्यंजनांऐवजीं केवळ १० व्यंजनांत तामिळी लिपि सामावलेली आहे.

व्यंजनांच्या या कमतरतेमुळें त्यांचें अडतें असें त्यांना वाटत नाहीं. पण इतर भाषाभाषीयांशीं संबंध आला म्हणजे मग तो भेद, ती उणीव—त्या उणीवेची जाणीव अगदीं तीव्र होते. उदाहरणार्थ, "वंदे मातरम्" याचा उच्चार 'वंते मादरम्, वंते मातरम्, वंथे माथरम्, वंदे मातरम्...' असा अनेक प्रकारांनीं होईल. लिपींत अक्षरेंच कमी तर एकाच अक्षराला अनेक उच्चार क्रमप्राप्त आहेत. 'बातालकुंडु' हें भूदान-यात्रेंतील एका मुक्कामाचें ठिकाण होतें. त्याचा उच्चार 'वत्ताल कुंट्ट, बथ्थाल गुंड्ड, बत्ताल गुंड्ड, बाताल कुंड्ड' असा अनेक रीतीचा ऐकूं आला. त्यामुळें अडचण होते ती अशी : पोस्टाच्या यादींत या गांवासाठीं कुठें धुंडावें? 'व' खालीं कीं 'ब' खालीं?







लिहिण्यांत जी अडचण तीच उच्चारांतहि. ' सुंदरेश्वर मूर्ति ' असें आमचें उच्चारण; तामीळ बांधव म्हणतील, ' सुंतरेश्वर मूर्दि ', ' सुंथरेश्वर मूर्थि ' ...या पर्यायांमुळें बोलतांना पुष्कळ घोटाळा उडतो. अर्थाचा अनर्थ होतो. कारण आपण ' क ख ग घ ' अशी चार व्यंजनें वापरतों त्याऐवजीं एकच वापरण्याचा रिवाज असला तर त्या एकाला चार उच्चार प्राप्त झाले असेंच नव्हे का ? सीता हें साधें इंग्रजींत लिहितांना ' सीथा ' असा उच्चार होण्यासारखें ' स्पेलिंग ' कां करतात ('गणपति'ऐवजीं ' गणपथि ' कां लिहितात ) हें यावरून लक्षांत येईल.

एवढ्यावरून तामीळ वाङ्मयाची तामीळमधील विविध व विपुल साहित्याची कुणीं कल्पना केली तर ती चुकीची ठरेल. कंबन ( कंबर ) म्हणून एक ' कविकुलगुरु ' होऊन गेला; त्यानें लिहिलेल्या रामायणाची तुलना फक्त तुलसीरामायणाशींच होऊं शकेल. ' तिरुक्कुरल ' या काव्याशीं तुल्य असें काव्य दुसऱ्या कुठल्याच देशी भाषांत नाहीं. मराठींत अष्टोत्तर-शत रामायणें लिहिणारा मयूरेश्वर पंडित कवि खरा; त्यानें मंत्ररामायण, मंत्रगर्भरामायण, मुनिरामायण, शिवरामायण, ' परंतु '-रामायण, दामरामायण, मात्रारामायण, फार काय ' निरोष्ठ '-रामायणहि लिहिलें. पण हे सर्व बौद्धिक कसरतीचे प्रकार होत. ' रामचरितमानस ' (तुलसी-रामायण) किंवा ' कंबन '-रामायण यांच्या पासंगासहि मोरोपंतांचा प्रयत्न पुरणार नाहीं. पारमार्थिक व पौराणिक वाङ्मयाखेरीज ललित कलांसंबंधीं दाक्षिणात्यांनीं केला तितका व्यासंग इतर कुठल्याहि भारतीय प्रांतांत झाला असेलसें वाटत नाहीं.

नाट्य-नृत्य-संगीत यांचा विचार करूं या. भारत व कथकली या नृत्यप्रकारांस लागणारें संगीत-वाद्य व गायन—सर्वस्वीं दाक्षिणात्यच नाहीं काय ? अष्टपदीचा प्रचार मद्रासेकडे आहे तितका मुंबई-दिल्लीकडे कुठें आहे ? अभिनयाला, नृत्याला अनुरूप अशीं गाणीं दाक्षिणात्यांनींच रूढ केलीं आहेत. उदाहरणार्थ, तंजावरच्या सरस्वतीमहाल लायब्ररींतलें एक संस्कृत पुस्तकच पाहा : गीतगोविंद (जयदेवकृत) या संस्कृत काव्याच्या प्रत्येक शब्दानुरूप अभिनय कोणता, हें मुद्रांचें स्पष्ट वर्णन करून तामीळमध्यें सांगितलें आहे. मराठींत नाट्यशास्त्र, नृत्य, संगीत या विषयांवर स्वतंत्र अशीं पुस्तकें आहेत काय ? नाहीं म्हणायला सरस्वतीमहालांतील नाट्यशास्त्रावरचा एक मराठी ग्रंथ छापून तयार होत आहे. त्याचें नांव ' नाट्यशास्त्रसंग्रह. '

अवय्यार म्हणून एक तामीळ कवयित्री होऊन गेली. तिचें काव्य अगदीं न्यारें आहे. मुलांना उपयोगी असें ' लघुतम ' काव्य तिनें लिहिलें. प्रत्येक ओळींत शब्द दोन. प्रत्येक ओळीची सुरुवात नव्या मुळाक्षरानें व्हावयाची. म्हणजे १२ स्वर व २३ व्यंजनें अशा ३५ ओळींत तें काव्य पुरें होतें. अक्षरओळख, पाठ करायला सोंपें व त्यांत अक्षय्य प्रकारचा उपदेश अशी त्या काव्याची रचना आहे. पाहिली ओळ " धर्मं चर " या अर्थाची आहे. कंबन, अवय्यार किंवा कुरलचा कर्ता हे तामीळमधील श्रेष्ठ कवी कुठले, कधीं जन्मले, कुठें शिकले याबद्दल ऐतिहासिक माहिती मिळत नाहीं. मात्र लोककथेनुसार ही तीनच नव्हे तर आणखी सहाजण (आठ भाऊ व एक बहीण) हीं नऊ भावंडें एका संन्याश्याची संतति होय. बायकोला न विचारतां संन्यास घेतलेल्या एका जवानास गुरूनें पुनः गृहस्थाश्रमी होण्याची आज्ञा दिली. त्यानें आपल्या बायकोशीं संसार सुरू केला; पण एका अटीवर. आपणांस होतील तीं मुलें घरीं बाळगायचीं नाहींत. (शंतनु-गंगा यांच्याप्रमाणें) तीं उपजतांच टाकून द्यावयाचीं ! ही देखील अट पत्करून त्या माउलीनें आठ पुत्रांना जन्म दिला. आठहि जणांचा त्याग केला. नववी मुलगी जन्मली तेव्हां जन्मदात्रीच्या डोळ्यांत साहजिक पाणी आलें. पण काय चमत्कार पाहा ! ती नुकती जन्मलली पोर आईला म्हणाली, " मी मुलगी आहे म्हणून तूं रडतेस होय ? पण माझ्या कपाळावर माझें पुढलें थोर भाग्य लिहिलेलें तुला दिसत नाहीं कीं काय ? " एवढ्या चमत्कारानें माउलीला पुष्कळ आधार वाटला. अश्रुपूर्ण नयनांनीं तिनें त्या मुलीचा निरोप घेतला.








—हीं नऊहि भावंडें आपापल्या परीनें थोर झालीं. त्यांनीं आपलें नांव अमर केलें. कंबन, अवय्यार, व कुरलकर्ता यांचीं काव्यें उपलब्ध आहेत. बाकीच्यांचें साहित्यच उपलब्ध नाहीं, ही मोठी खेदाची गोष्ट वाटते. पण ही केवळ दंतकथा आहे हें विसरूं नये.

सुब्रह्मण्यभारती हा आधुनिक तामिळी कवि मोठा प्रभावी होता म्हणतात. त्याच्या काव्यामुळें राष्ट्रीय चळवळींत सामील झालेल्या तरुणांची संख्या हजारोंनीं मोजतां येईल. आणखीहि लहान-मोठे पुष्कळ कवी राष्ट्रीय वृत्तीचे असले पाहिजेत. भूदान-यात्रेचीच गोष्ट पाहाना ! तिजसाठीं सुंदर सुंदर काव्यें करून देणारे कवी आपण होऊन पुढें येतात. अनुरूप कवनें करून देतात. ही तामिळी जागृतीची बाब नव्हे तर काय ?

भूमिदान हें पुण्यांतलें श्रेष्ठ पुण्य होय, अशा अर्थाचें ‘ ध्रुपद ’ घालून भूदानयात्रेसाठीं केलेलें तामीळ गाणें आतां खेडोखेडीं लोकप्रिय ठरलें आहे. आपल्याकडे मात्र या बाबतींत अगदीं थंडा कारभार ! मराठी कवींनीं अशीं प्रासंगिक काव्यें केलीं आहेत काय ? योगायोग असा कीं, दिंदिगल शहरीं भूदानयात्रा पोंचली तेव्हां ‘ छावणी ’त एक जाडा कागद मिळाला. त्यावर नामवंत मराठी कवीनें केलेलें काव्य छापलें होतें; तेंहि प्रासंगिकच; पण माजी राजघराण्यांतल्या विवाहाभिनंदनाबद्दल तें होतें. अर्थात् तें ‘ अर्थकृत ’ होतें हें उघड आहे. राजकीय, सामाजिक चळवळीबद्दल आमचे ‘ कवडे ’ कोणती भावना बाळगून आहेत, दैनंदिन जीवनाशीं त्यांचा संबंध कितपत येतो, या दोन्ही गोष्टींचा तपास कुणीहि करावा आणि काय तें ठरवावें !

भूदान-यात्रेच्या निमित्तानें घडलेल्या या तामीळ लोक-निरीक्षणांत त्यांच्या प्रचंड देवळांचें त्यांच्या शेतीभातीचें, वस्त्रप्रावरणांचें, डाग-डागिन्यांचें, त्यांच्या आवडीनिवडींचें...असें पुष्कळ लिहावयाचें राहिलें आहे. पण सांगोपांग तामीळ देश--व लोक– वर्णन करण्याचें मीं ठरविलें नाहीं. तितका अवधीहि अभ्यासासाठीं किंवा निरीक्षणा-साठीं मिळाला नाहीं. सवड मिळेल त्याप्रमाणें आणखीहि थोडें लिहूं केव्हां तरी. आतां एवढेंच पुरें.

---

## अविचाराला ‘ नो व्हेकन्सी ! ’

क्षतांळलेल्या जीर्ण उरावर
गतकाळाचें कराल तांडव,
वर्तमान हो रुग्ण क्षयानें
भाविकाल–सटवीचें शैशव !

क्रूर अघाशी नियती करिते
स्वेदाश्रूंचें अविरत प्राशन,
अन्तरांतली ग्रीष्मयामिनी
तगमगते निर्वायु होवुन.

हळूंच ये निःसंज्ञ मनावर
विरक्ततेची शीतल फुंकर,
युगान्त-निद्रा मुचकुंदाची
कालयवन तत्पर्येकावर.

कधीं मनोराऊळीं थरारे
कृष्ण कल्पना निर्वाणाची
आसक्तीचा सावध निग्रह—
अविचाराला ‘ नो व्हेकन्सी ! ’

—राम शेवाळकर










श्री. शंकरराव देव

# सर्वोदयाच्या साधनेची गुप्त सरस्वती

ऑगस्ट-सप्टेंबर १९५२ च्या 'नवभारता'-च्या लोकशाही-विशेषांकांत आचार्य शंकरराव जावडेकर यांचा 'आधुनिक भारतीय लोकशाहीचा विकास' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. श्री. शंकररावांनीं आपल्या लेखाचें प्रयोजन लेखाच्या आरंभींच स्पष्ट केलें आहे. ते लिहितात : "...... आधुनिक भारतांत लोकशाहीची स्थापना व्हावी यासंबंधीं आम्हीं जे प्रयत्न केले, त्यांचें स्वरूप कोणतें होतें आणि त्या प्रयत्नांतून आज आपल्या राष्ट्रांत जें लोकशाही राज्य निर्माण झालें आहे त्याचें स्वरूप व भवितव्य काय होणार आहे, या दोनच प्रश्नांचा विचार या लेखांत अगदीं थोडक्यांत करावयाचा आहे." यांत पहिला भाग इतिहासकथनाचा म्हणजे भूतकाळांत जशा घटना घडल्या तशाच त्या सांगण्याचा आहे, तर दुसरा भाग भविष्यकाळांत कोणत्या घटना घडतील याचा अंदाज करण्याचा आहे. पहिल्या भागांत वस्तुनिष्ठ सत्याची अधिक अपेक्षा असते, तर दुसऱ्यांत आत्मनिष्ठ सत्याला अधिक अवकाश मिळतो. भूतकाळचा आढावा घेतांना व भविष्यकाळाचा अंदाज करतांना श्री. शंकररावांच्या लेखांत वस्तुनिष्ठ सत्याच्या अपेक्षेचा थोडा भंग झाल्यामुळेंच मी हा लेख लिहिण्यास प्रवृत्त झालों आहे. त्यांत श्री. शंकररावांनीं आपल्या लेखांत जे विचार मांडले आहेत व जीं विधानें केलीं आहेत त्यांना विरोध करावा, तीं खोडून काढावींत असा माझा मुळींच हेतु नाहीं हें मी प्रथम स्पष्ट करूं इच्छितों.

**स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीं साध्यसाधनाविषयीं ऐकमत्य**

"आधुनिक भारतांत लोकशाही राजकारणाची मुहूर्तमेढ इ. स. १८८५ सालीं राष्ट्रीय सभेची संस्थापना करून भारतीय नेत्यांनीं मुंबई शहरांत रोविली" असें जें श्री. शंकरराव म्हणतात त्याबद्दल दोन मतें होतील असें वाटत नाहीं. ज्यांनीं काँग्रेसची संस्थापना केली, त्यांनीं आपल्या डोळ्यापुढे ब्रिटिश पार्लमेंटचा आदर्श ठेवला होता आणि ब्रिटिश पार्लमेंट म्हणजे लोकशाहीची जननी. तेव्हां काँग्रेसचें पालनपोषण लोकशाहीच्या अन्नावर झालें असलें तर त्यांत नवल असें कांहींच नाहीं. तसें होणें अगदीं स्वाभाविक होतें. काँग्रेस-संस्थापनेपासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या साठ वर्षांच्या दीर्घ काळांत तीनचार पिढ्यांतील कर्तृत्ववान्, लोकप्रिय अशा काँग्रेसच्या असामान्य नेत्यांनीं आटोकाट प्रयत्न करून तिचें लोकशाही स्वरूप टिकविण्याचा यशस्वी प्रयत्न केला, हें सत्य कोणीहि मान्य करील. ज्या गांधीजींनीं राष्ट्रसभेची वाढ लढाऊ व क्रांतिकारक संस्थेंत केली, त्यांनींसुद्धां तिच्या अन्तर्गत कारभारांत लोकशाही जिवंत ठेविली असें म्हणणें भाग आहे. कारण, परकीय सत्तेशीं लढा देत असतांहि तिच्यांत पोटपक्ष स्थापण्यास अखेरपर्यंत स्वातंत्र्य होतें व काँग्रेसच्या शिस्तीचा आधार केवळ नैतिक शक्ति हाच होता.

पण हें सर्व मान्य करूनहि येथें एक गोष्ट नमूद करणें जरूर आहे. स्वातंत्र्य मिळेपर्यंत राष्ट्रीय सभा परकीय सरकारशीं सनदशीर व (अहिंसात्मक) क्रांतिकारक मार्गांनीं सत्तेसाठीं लढणारी जरी संस्था होती, तरी तिच्यांतील पक्षोपपक्षांत साध्य व








साधनाबद्दल जवळजवळ ऐकमत्य असे. जेव्हां काँग्रेसमधील पक्षांत या दोन गोष्टींबद्दल तीव्र मत-भेद होत, तेव्हां त्यांतील एक पक्ष काँग्रेसमधून फुटून बाहेर पडे, असें १९०६–७ सालचा बहिष्कारयोगाचा व १९२०–२२ सालचा असहयोगाचा इतिहास दर्शवितो. स्वातंत्र्यप्राप्ती-नंतर काँग्रेसमधील निरनिराळ्या पक्षोपपक्षांत साध्य-साधनांमधील, विशेषतः साध्यांमधील एकवाक्यता राहणें असंभवनीय होतें. जेव्हां एखादा पक्ष सत्ता-धारी होतो, तेव्हां त्यांत उपपक्ष निर्माण झाले तर तो फार काळ टिकणें शक्य नाहीं, हें लोकशाहीचें अगदीं बाळकडू प्यालेल्या इंग्लंडमधील मजूरपक्षांत आज जें अन्तर्गत वादळ उत्पन्न झालें आहे, त्या-वरून सिद्ध होतें.

## समाजवादी पक्षाचा उदय आणि त्याचा काँग्रेसत्याग

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेसनें जर गांधीजींचा सल्ला स्वीकारला असता व स्वातंत्र्यपूर्व काळांतील आपलें जीर्ण शरीर टाकून देऊन नवीन शरीर धारण केलें असतें, म्हणजे सत्तेच्या राजकाणाचा त्याग करून केवळ लोकसेवेचें व्रत अंगीकारिलें असतें, तर पंडित नेहरू व जयप्रकाशजी या दोघांनाहि काँग्रेस सोडावी लागली असती. कारण, दोघांनाहि सत्तेचें राजकारण करावयाचें होतें व आहे. म्हणून गांधीजींचा सल्ला व इशारा धुडकावून न लावतां काँग्रेस 'लोकसेवासंघ' बनली असती तर समाजवादी पक्षानें तिचा त्याग केला नसता, असें श्री. शंकर-रावांना सुचवावयाचें आहे, असा जो वाचकांच्या मनावर परिणाम होतो, तो बरोबर नाहीं. काँग्रेस-लोकसेवकसंघ बनल्यावर समाजवादी पक्ष काँग्रेस-मधून जर बाहेर पडला नसता, तर सत्तेची इच्छा करणारा दुसरा पक्ष देशांत निर्माण करून भारतांत लोकशाही टिकविण्याचा खरा प्रयत्न श्री. जय-प्रकाशजी व समाजवादी पक्ष यांनीं केला आहे असा दावा करण्याला श्री. शंकरराव यांना मुळींच आधार मिळाला नसता. श्री. शंकरराव लिहितात : "या परिस्थितींत राष्ट्रांतील लोकशाही निष्ठा जागृत ठेवून, म. गांधींनीं दाखवून दिलेल्या अनत्याचारी क्रांतितंत्राचा उपयोग करून, आर्थिक लोकशाहीची अथवा समाजवादाची क्रांति कर-ण्याच्या उद्दिष्टानें भारतीय समाजवादाची संस्था-पना करणारा पक्ष काँग्रेसचा त्याग करून जनतेच्या पुढें आला," "...भारतीय तरुणांच्या अंतःकरणां-तील समाजवादी क्रांतिनिष्ठेला लोकशाहीचें व अनत्याचारी वृत्तीचें वळण लावणारा हा समाजवादी पक्ष भारतांत या वेळीं निर्माण झाला नसता, तर दादाभाई नौरोजी, टिळक, गोखले, गांधी यांनीं निर्माण केलेली लोकशाहीनिष्ठा नष्ट होण्यास फार काळ लागला नसता."

खरा इतिहास असा आहे : १९४२ सालच्या लढ्यांतून बाहेर आल्यानंतर, १९४५ सालीं बदललेली परिस्थिति लक्षांत घेऊन काँग्रेसची नवी घटना बनविण्यासाठीं अ. भा. काँ. कमिटीनें पांच सभासदांची एक समिति नेमली, तींत श्री. नरेंद्र देव होते. पण अनेक कारणांमुळें नवीन घटना तयार होऊन ती पास होण्याला जवळजवळ तीन वर्षें लागलीं. अगदीं प्रथम नेमलेली समिति मध्यंतरीं मोठी करण्यांत आली. तींत नरेन्द्र देव होतेच. शिवाय श्री. जयप्रकाशजीहि तींत आले. यानंतर एक दुसरी अगदीं नवीनच समिति नेमण्यांत आली. तींत श्री. नरेन्द्र देव राहिले. या कमिटीनें तयार केलेल्या घटनेवर काँग्रेसनें जयपूरला डिसेंबर १९४८ मध्यें शिक्कामोर्तब केलें. काँग्रेसच्या या नवीन घटनेप्रमाणें तिच्यांत एकापेक्षां अधिक पक्षांना स्थान राहिलें नाहीं. काँग्रेसच्या घटनेंत हा महत्त्वाचा बदल होऊं नये म्हणून समाजवादी पक्षानें शेवटपर्यंत कसून विरोध केला. पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. काँग्रेसमधून समाजवादी पक्ष जो बाहेर पडला, त्याचें त्या वेळीं मुख्य कारण हें असें होतें. श्री. शंकररावांनीं वर म्हटलें आहे, "हा समाजवादी पक्ष भारतांत या वेळीं निर्माण झाला नसता—" 'या वेळीं' म्हणजे केव्हां ? १९४८ मध्यें ? कारण लेखांतील कालानुक्रमाशीं 'या वेळीं' चा संबंध जोडला, तर समाजवादी पक्ष १९४७–४८ मध्यें निर्माण झाला असें मानावें लागेल; निदान श्री. शंकररावांच्या लिखाणानें वाचकांचा तसा ग्रह होण्याचा फार संभव आहे. पण समाजवादी पक्षाचा जन्म फार अगोदर, काँग्रेसच्या आयुष्यांत हे गुंतागुंतीचे पण







साठीं अमेरिकेनें कोणत्या धोरणाचा अवलंब करावा, याचें तपशीलवार विवेचन मात्र केलें नाहीं. प्रतिपक्षांवर हल्ला करणें हा निवडणूकमोहिमेचा आवश्यक भाग असल्यामुळें डेमोक्रॅटिक सरकारच्या परराष्ट्रीय धोरणावरील आयसेनहॉवरची टीका ही त्या प्रकारांत जमा होईल. पण परराष्ट्रीय धोरणाची स्वतंत्र आंखणी आयसेनहॉवरच्या प्रचारांत कोठें आढळत नाहीं.[४] रिपब्लिकन पक्षाची उमेदवारी मिळण्यापूर्वी सेनेटर टाफ्ट व त्यांचा गट यांच्या परराष्ट्रीय धोरणावर आयसेनहॉवरपक्षानें हल्ला चढविला. त्या वेळीं टाफ्टच्या अलिप्ततावादी धोरणापेक्षां अगदीं वेगळें असें आंतरराष्ट्रीय धोरण तरी आयसेनहॉवरनें पुरस्कारिलें.[५] पण त्या पुरस्कारामुळें डेमोक्रॅटिक सरकारच्या प्रस्तुतच्या परराष्ट्रीय धोरणाचाच परिणामतः आयसेनहॉवरनें पाठपुरावा केला. सेनेटर टाफ्ट हा रिपब्लिकन पक्षाच्या पुराणमतवादी परंपरेचा खरा प्रतिनिधि आहे. त्याचा पिंड अलिप्ततावादीच आहे. किंबहुना टाफ्टच्या या भूमिकेवर व वैशिष्ट्यावर भर देऊनच आयसेनहॉवरनें रिपब्लिकन पक्षाच्या अधिवेशनांत टाफ्टचा पराभव करून स्वतःच्या उमेदवारीला पक्षाचा पाठिंबा मिळविला. उत्तर ॲट्लांटिक कराराला मान्यता देण्यास टाफ्टचा विरोध होता, तर या करारानुसार जी नवी संघटना निर्माण झाली त्या संघटनेचें नेतृत्व आयसेनहॉवरनें पत्करलें होतें व आजहि या उत्तर ॲटलांटिक संघटनेचा पाठपुरावा करण्याचें धोरण आयसेनहॉवरचें आहे. पश्चिम युरोपांतील दोस्त राष्ट्रांना वार्षिक व लष्करी मदत करण्यास टाफ्टचा विरोध होता. याउलट रशियाच्या वर्चस्वाखालीं नसलेल्या राष्ट्रांना साम्यवादी साम्राज्याचें आक्रमण थोपवून धरण्याला उद्युक्त करण्यासाठीं अमेरिकेनें साहाय्य केलें पाहिजे, असें आयसेनहॉवरचें मत आहे. टाफ्ट व त्याच्या गटाच्या मतें, अमेरिकेनें प्रतिकारक हवाई सामर्थ्यामध्यें प्रचंड वाढ करून इतर राष्ट्रांना पूरक साहाय्य द्यावें व मुख्यतः अमेरिकेच्या संरक्षणाची खबरदारी घ्यावी; तर आयसेनहॉवरच्या मतें, हवाई सामर्थ्य हें लष्करी व आरमारी सामर्थ्याच्या जोडीनें वापरलें पाहिजे, म्हणून अमेरिकेनें इतर राष्ट्रांना साहाय्य देतांना केवळ हवाई सामर्थ्यावर भर देऊन भागणार नाहीं. संयुक्तराष्ट्रसंघटनेला पाठिंबा देणें, अमेरिकेचें प्रचारसाधन 'व्हॉईस ऑफ अमेरिका' यासाठीं शक्य तो खर्च मंजूर करणें, आर्थिक व राजकीय दृष्ट्या पश्चिम युरोपची संघटना बळकट करणें आणि रशियाला नवनव्या प्रदेशावर साम्राज्य मिळवूं न देणें हीं आयसेनहॉवरच्या परराष्ट्रीय धोरणाचीं अंगें आहेत. तो सामुदायिक सुरक्षिततेचा पुरस्कर्ता आहे. यामुळें आयसेनहॉवरचें परराष्ट्रीय धोरण सध्यांच्या सरकारी धोरणापेक्षां फार वेगळें राहील असें म्हणण्यास आधार नाहीं.

आतां सध्यांच्या अमेरिकन सरकारच्या धोरणाप्रमाणें इतर राष्ट्रांना ज्या प्रमाणांत अमेरिका मदत करीत आहे, त्या प्रमाणांत कपात होईल हें खरें; पण हें कपातीचें धोरण केवळ रिपब्लिकन पक्षानेंच पुरस्कारिलें होतें असें नसून, डेमोक्रॅटिक पक्षांतील कित्येक सभासदांनासुद्धां अमेरिकेबाहेर मदतीदाखल जाणाऱ्या रकमेमध्यें कपात करावी असें वाटत होतें. गेल्या मे महिन्यामध्यें युरोपांतील राष्ट्रांच्या सुरक्षेसाठीं आर्थिक साहाय्य मंजूर करण्याचा प्रश्न सेनेटपुढें आला असतांना प्रतिनिधिगृहानें मंजूर केलेल्या रकमेंत २० कोटि डॉलरची कपात करण्यांत आली. कपातीच्या बाजूनें ज्या ३७ सभासदांनीं मतें दिलीं त्यांपैकीं २६ रिपब्लिकन

---

४ नाहीं म्हणावयास, कोरियाची लढाई अमेरिकन सैन्यानें लढण्याऐवजीं दक्षिण कोरियन सैन्यानेंच लढावी हा एक मुद्दा अपवादादाखल सांगतां येईल.

५ "Our highest purpose is to work with every resource at our command for real and lasting peace in the world. To do justice to this great job we must have allies. We cannot stand alone. Americans know that isolationism is dead. They know, peace requires the combined strength will, purpose of all free nations."—आयसेनहावरच्या निवडणूकमोहिमेंतील व्याख्यानांतून

पक्षाचे होते तर ११ डेमोक्रॅटिक पक्षाचे होते. तेव्हां आयसेनहॉवर अध्यक्ष झाल्यामुळें परराष्ट्रांना आर्थिक साहाय्य देण्याच्या धोरणांत मूलग्राही फरक होईल असें वाटत नाहीं.

अतिपूर्वेकडील धोरणाबद्दल रिपब्लिकन पक्षानें वेळोवेळीं नापसंती व्यक्त केली होती हें खरें. पण अतिपूर्वेकडील धोरणांत ज्या प्रमुख प्रश्नांचा समावेश झाला आहे त्यांचा विचार केला म्हणजे त्याहि बाबतींत आयसेनहॉवरचें धोरण प्रस्तुत धोरणापेक्षां निराळ्या दिशेनें जाईल असें वाटत नाहीं. नवचीनला मान्यता द्यावयाची नाहीं हें सध्यांचेंच धोरण आयसेनहॉवर चालू ठेवील. मँचुरियावर हल्ला करून कोरियामध्यें लढाईचें क्षेत्र विस्तृत करावें ह्या ज. मॅकआर्थरच्या कल्पनेची आयसेनहॉवरनें स्पष्ट हेटाळणी केली आहे. प्रतिबंधक लढाई-( preventive war )ची कांहीं रिपब्लिकन लोकांची कल्पना त्यानें हास्यास्पद ठरविली. राष्ट्रीय चीनच्या सरकारला साहाय्य करून चीनच्या मुख्य भूमीवर हल्ला करायला लावावा या कल्पनेचाहि त्यानें उपहास केला आहे. आतां कोरियाच्या प्रश्नाचा समाधानकारकपणें शेवट लावण्याचें आश्वासन आयसेनहॉवरनें दिलें व त्यासाठीं तो कोरियाच्या रणक्षेत्राला भेट देऊन येईलहि. पण हा प्रश्न सोडविण्यासाठीं सध्यांच्या परराष्ट्रीय धोरणामध्यें तो काय बदल करूं शकेल याची कांहींच कल्पना कोणाला देतां येत नाहीं.

## रशियाच्या साम्राज्यविस्ताराला मर्यादा

सोव्हिएट रशियाचें सामर्थ्य व सोव्हिएट राज्यकर्त्यांचे हेतु यांसंबंधींचे अमेरिकन सत्ताधिकाऱ्यांचे अंदाज हाच आजच्या अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाचा पाया आहे. दुसऱ्या महायुद्धापासून सोव्हिएट रशियाच्या संबंधामध्यें अमेरिकेला जो अनुभव आला, तो जमेस धरून हे अंदाज आंखले गेले व त्या अनुरोधानें रशियाच्या साम्यवादी साम्राज्यविस्तारावर मर्यादा घालावयाची ( Containment ), हें अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाचें मुख्य सूत्र बनलें.[६] हें धोरण अंमलांत आणण्यासाठीं ( १ ) रशियाबरोबर वाटाघाटींचा दरवाजा खुला ठेवावयाचा आणि त्याच वेळीं ( २ ) साम्यवादी वर्चस्वाखालीं न गेलेल्या राष्ट्रांचें सामर्थ्य वाढवावयाचें—हे दोन मार्ग अमेरिकन सरकारनें स्वीकारले. गेलीं पांच वर्षें अमेरिकेनें परराष्ट्रीय संबंधांत ज्या अनेक योजना आंखल्या—ट्रूमन-तत्त्व, मार्शल-योजना, चतुर्थ. कलमी योजना, उत्तर अॅटलांटिक संघटना, अँझस करार इ.—या सर्व योजनांचा हेतु साम्यवादी साम्राज्यविस्तारावर मर्यादा घालणें हाच होता. हें धोरण नकारात्मक असून त्याऐवजीं गतिमान् असें 'मुक्तिदायी' ( liberation ) धोरण स्वीकारलें पाहिजे अशी रिपब्लिकन पक्षाची भूमिका.[७] रशियाच्या वर्चस्वाखालीं असलेल्या पूर्व युरोपमधील राष्ट्रांना त्या वर्चस्वापासून मुक्त करावयाचें असें हें धोरण आहे. हें धोरण मात्र सध्यांच्या सरकारी धोरणापेक्षां वेगळें आहे हें निश्चित. रशियाच्या अंकित राष्ट्रांमध्यें प्रस्थापित सरकारविरुद्ध तेथील जनतेला चिथावणी देऊन राज्यक्रांति घडवून आणणें असा या धोरणाचा अर्थ होतो. हा कार्यक्रम जर रिपब्लिकन पक्षानें खरोखरच हातीं घेतला, तर युद्धाची शक्यता नक्कीच वाढेल. पण अमेरिकन जनतेच्या रशियाविरोधी भावनेचा फायदा बहुमत मिळविण्यासाठीं करून घेण्याच्या दृष्टीनेंच रिपब्लिकन पक्षानें या नव्या धोरणाचा आपल्या कार्यक्रमामध्यें समावेश करून घेतला असावा. आणि ज्याअर्थीं अमेरिकेला दोस्त राष्ट्रांची जरूरी आहे या मुद्द्यावर आयसेनहॉवरनें भर दिला त्याअर्थीं ज्या 'मुक्तिदायी' युद्धपिपासू धोरणाला पश्चिम युरोपांतील राष्ट्रें विरोध

---

६ अमेरिकेच्या रशियासंबंधींच्या या धोरणाचें दिग्दर्शन १९४७ सालीं 'फॉरिन अफेअर्स' या त्रैमासिकामध्यें "Sources of Soviet Conduct" या लेखामध्यें 'X' या टोपण नांवाखालीं परराष्ट्रखात्याचे सल्लागार केनन यांनीं केलें आहे.

७ रिपब्लिकन पक्षाचे परराष्ट्रीयसंबंधांतील प्रमुख सल्लागार जॉन फॉस्टर डलस यांनीं पक्षाच्या कार्यक्रमामध्यें या नव्या धोरणाचा पुरस्कार केला आहे.












करतील हें निश्चित, त्या धोरणाचा पुरस्कार त्याला अभिप्रेत नसावा असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

### कायदेमंडळांतील संभाव्य नवा बनाव

निवडणुकीमुळें निर्माण झालेल्या परिस्थितींत नव्या परराष्ट्रीय धोरणाची अंमलबजावणी करणें कितपत शक्य आहे हाहि मुद्दा विचारांत घेण्यासारखा आहे. आयसेनहॉवरला प्रचंड विजय मिळाला असला तरी अमेरिकेच्या कायदेमंडळामध्यें रिपब्लिकन पक्षाला फार मोठें बहुमत मिळालें नाहीं ही गोष्ट तितकीच स्पष्ट आहे. आणि तेथील कायदेमंडळामध्यें राजकीय पक्षाचीं बंधनें इंग्लंडप्रमाणें किंवा भारताप्रमाणें फार कडक नसल्यामुळें, सभासद अनेक वेळां स्वतंत्रपणें मतें देतात.[८] अशा परिस्थितींत रिपब्लिकन पक्षाचें बहुमत—विशेषतः अमेरिकेच्या कायदेमंडळाची प्रभावी शाखा जी सेनेट—तेथें अगदीं नाममात्र आहे, या गोष्टीला महत्त्व आहे. त्यामुळें येत्या काँग्रेसमध्यें महत्त्वाच्या परराष्ट्रीय प्रश्नांचा निर्णय रिपब्लिकन—विरुद्ध—डेमोक्रॅटिक, असा पक्षाभिनिवेशानें न लागतां उदारमतवादी रिपब्लिकन व पुरोगामी डेमोक्रॅट—विरुद्ध—पुराणमतवादी रिपब्लिकन व प्रतिगामी डेमोक्रॅट असा लागण्याचा संभव जास्त आहे. त्यामुळें काँग्रेसच्या कामामध्यें संघर्ष वाढण्याचा संभव दिसतो. पण अशा परिस्थितींत अध्यक्ष या नात्यानें आयसेनहॉवरला स्वतःचें मत प्रभावी करण्यास पुरेसा वाव मिळेल.[९]

निवडणुकीमध्यें यश मिळविण्यासाठीं रिपब्लिकन पक्षाच्या जुन्या अधिकाऱ्यांचें नियंत्रण आयसेनहॉवरनें स्वीकारलें. तो पक्षयंत्रणेच्या आहारीं गेला त्यामुळेंच त्याची प्रचाराची पातळी स्टीव्हन्सन्प्रमाणें फार वरच्या दर्जावर राहिली नाहीं. पण परराष्ट्रीय धोरणाबाबत पक्षाच्या जुन्या पुढाऱ्यांशीं आयसेनहॉवरचे मतभेद असल्यामुळें त्याला त्यांच्याच तंत्रानें चालण्याचें कारण नाहीं. अमेरिकेचें परराष्ट्रीय धोरण हें दोन्ही पक्षांच्या संमतीनेंच चाललें पाहिजे असें मत आयसेनहॉवरनें अनेकदां व्यक्त केलें आहे. परराष्ट्रीय धोरणासंबंधींचीं त्याचीं स्वतःचीं मतें अभ्यसिलीं असतां ही गोष्ट स्वाभाविक व सहज शक्य आहे हें पटतें; पण त्यासाठीं पक्षांतील जुन्या पुढाऱ्यांचा विरोध पत्करूनहि कायदेमंडळाचें बहुमत त्याला आपल्या बाजूला मिळवावें लागेल. त्याचें व्यक्तिमत्त्व, जनतेनें दिलेला प्रचंड पाठिंबा व कायदेमंडळाचा नवा बनाव यांमुळें ही गोष्ट आयसेनहॉवरला अगदींच अशक्य ठरणार नाहीं असें वाटतें.

---

(८) गेल्या वर्षीच्या सेनेटच्या बैठकींत महत्त्वाच्या प्रश्नांवर जें मतदान झालें त्याचे पुढील कांहीं आंकडे या दृष्टीनें बोधप्रद ठरतील :

| | | डेमोक्रॅटिक | रिपब्लिकन |
|---|---|---|---|
| (अ) युरोपांत अमेरिकन सैन्य पाठवावें या ट्रूमन-निर्णयावर बंधन घालावें | बाजूनें : | १ | ३० |
| | विरुद्ध : | ४३ | १३ |
| (ब) भारताला धान्याची मदत न देतां ती कर्जरूपानें द्यावी | बाजूनें : | १५ | ३७ |
| | विरुद्ध : | ३० | २ |
| (क) युरोपच्या मदतींत कपात करावी. | बाजूनें : | ११ | २६ |
| | विरुद्ध : | २७ | ७ |
| (ड) चतुर्थकलमी योजनेंत कपात करावी. | बाजूनें : | २ | २७ |
| | विरुद्ध : | ३८ | ९ |

(९) पाहा : ' Eisenhower 's great individual appeal was the biggest factor in victory. It should simplify his task of leadership within his own party. "—' ख्रिश्चन सायन्स मॉनिटर '.








# सार संकलन

## श्री स्वामी केवलानन्द यांची ७५ वी वर्षपूर्ति

*श्री स्वामी केवलानन्द (पूर्वाश्रमींचे नारायणशास्त्री* मराठे) यांची ७५ वी वर्षपूर्ति वांई येथें ता. २१-११-५२ रोजीं मोठ्या उत्साहानें आणि जिव्हाळ्यानें साजरी झाली. मुख्य समारंभाचे अध्यक्ष मुंबईच्या उच्च न्यायालयाचे न्यायाधीश न्यायमूर्ति प्र. बा. गजेन्द्रगडकर हे होते. या प्रसंगाच्या निमित्तानें श्री स्वामी केवलानन्दांना अभिवादन करण्याकरितां त्यांच्या पूर्वविद्यार्थ्यांचा, सहकाऱ्यांचा, स्नेह्यांचा आणि चहात्यांचा मोठा समुदाय उपस्थित होता. या दोन दिवस चाललेल्या अभिनंदन-उत्सवप्रसंगीं वेळोवेळीं ज्यांनीं स्वामीजींबद्दलचें आपलें विविध ऋण कृतज्ञतेनें मान्य करून आपला आदरभाव मोठ्या जिव्हाळ्यानें व्यक्त केला, त्यांत संस्कृतचे महापंडित म. म. पां. वा. काणे, सुप्रसिद्ध कायदेपंडित प्राचार्य घारपुरे, प्राचीन विद्येचे महान् व्यासंगी व पत्रपंडित श्री. ज. स. करंदीकर, मध्यप्रांतांतील प्रखर देशभक्त, उत्कट मानवतावादी आणि प्रभावी वक्ते श्री. दिनकरशास्त्री कानडे, प्रसिद्ध सामाजिक कार्यकर्ते आणि पत्रपंडित श्री. श्री. शं. नवरे, प्रसिद्ध चतुरस्र चिकित्सक विद्वान् साहित्यिक प्रा. न. र. फाटक, असामान्य बुद्धिमत्ता, प्रगाढ पांडित्य आणि सुंदर प्रतिभा यांचा संगम असलेले, धर्मकोशाची धुरा वाहणारे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, धर्मनिर्णय-मंडळाचे निष्ठावंत कार्यकर्ते तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे, हिंदुत्वाचे तेजस्वी प्रचारक महादेवशास्त्री दिवेकर इत्यादि निरनिराळ्या क्षेत्रांतील लोक होते. हे सर्व गृहस्थ सुप्रसिद्ध असून, त्यांचें कार्य त्यांच्या कार्यक्षेत्रांतील कार्यकर्त्यांना स्फूर्ति व प्रेरणा देणारें आहे ही गोष्ट लक्षांत घेतली, तर स्वामी केवलानन्दांच्या व्यक्तिमत्त्वांतील सर्वगामी प्रेरक सामर्थ्याचें सामाजिक महत्त्व विशेषच वाटतें. गेलीं ५० वर्षे या संन्यस्त वृत्तीच्या महान् पुरुषाचें समाजाभिमुख ज्ञानोपासना आणि उदात्त चारित्र्य यांनीं युक्त असें व्यक्तिमत्त्व कार्यकर्त्यांना प्रेरणा देत उभें आहे, हें प्रत्ययास येतें.

स्वामी केवलानन्दांना वरील प्रसंगीं एक मोठा अभिनंदनग्रंथ अर्पण करण्यांत आला.[1] त्यांत म. म. पां. वा. काणे, डॉ. के. ल. दप्तरी, म. म. वा. वि. मिराशी, डॉ. अळतेकर, प्रा. प. कृ. गोडे, डॉ. एस्. एम्. कत्रे, डॉ. रा. ना. दांडेकर, प्रा. ह. दा. वेलणकर, श्री. भवानीशंकर नियोगी इत्यादि सुप्रसिद्ध विद्वानांचे अनेक विषयांवर संशोधनात्मक व्यासंगपूर्ण लेख आहेत. या ग्रंथांत आरंभींच्या विभागांत स्वामीजींना आचार्य विनोबा, डॉ. के. ल. दप्तरी, श्री. मा. श्री. अणे इत्यादींनीं आपले आदरांजलि अर्पण केले आहेत. डॉ. के. ल. दप्तरी यांनीं तर स्वामीजींना 'स्वतंत्र भारताचे गुरु' असें संबोधून त्यांच्या कार्याचें दिग्दर्शन केलें आहे. याच आरंभींच्या विभागांत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं स्वामी केवलानन्दांचें सुमारें ४५ पानांचें चरित्र लिहिलें आहे. हें अल्पसें चरित्र मोठ्या नावीन्यपूर्ण आणि मनोवेधक अशा आधुनिक शैलीनें लिहिलेलें असून, त्यांतील अनेक वैशिष्ट्यें आधुनिक दृष्टीच्या वाचकांच्या नजरेंत भरण्यासारखीं आहेत. १९१४ सालापासून लक्ष्मणशास्त्री आपल्या गुरुवर्यांच्या सान्निध्यांत आहेत. त्यामुळें साहजिकच स्वामीजींविषयीं जिव्हाळा या चरित्रांतून वाहत आहे. आपल्या प्रतिभाशाली शैलीनें तर्कतीर्थांनीं स्वामीजींच्या व्यक्तिमत्त्वाचीं, त्यांच्या जीवनांतील विविध प्रसंगांचीं सुंदर शब्दचित्रें रेखाटलेलीं आहेत. स्वामीजींच्या चरित्रांतील भव्य नैतिक आदर्शांचें चित्रण करीत असतांना, त्यांचें सामाजिक अनुसंधान दाखवून, त्या आदर्शांमागील मानसिक वृत्तींचें त्यांनीं आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें मोठ्या मार्मिकपणें, सूक्ष्म, सूत्रमय विश्लेषण

---

१ श्री गु. स्वामी केवलानन्दसरस्वती : ७५ वी वर्षपूर्ति-अभिनंदन-ग्रंथ. संपादक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (मार्गशीर्ष शु. ४, शके १८७४). प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई, पानें ३५७

केलें आहे. म्हणून हें चरित्र वाचीत असतां श्री. लक्ष्मणशास्त्री यांच्या प्राचीन व आधुनिक शास्त्रांतील व्युत्पन्नतेची आणि त्यांच्या प्रतिभेची चुणूक दिसून येते. या चरित्रविभागांतील उतारे पुढें दिले असून त्यांवरून स्वामी केवलानन्दांचें व्यक्तिमत्त्व व त्यांच्या कार्याचें सामाजिक महत्त्व दिसून येईल.

" आमच्या गुरुवर्यांना लाभलेली परंपरा पांडित्यापेक्षांहि आध्यात्मिक निष्ठेला महत्त्व देणारी होती. शब्दप्रामाण्यापेक्षां सारासारविचारांचें मूल्य अधिक मानणारी होती. अपरिग्रह वृत्ति, तप, ध्यान व तत्त्वचिंतन यांत आयुष्य व्यतीत करून परमार्थाची साधना करणें हा ध्येयवाद होता. या परंपरेला अध्यापन व लोकशिक्षण या कर्मयोगाच्या अंगांची जोड गुरुवर्यांनीं दिली "..." स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीच्या आधारावर १९०५ सालच्या सुमारास आपल्या देशांत जी चळवळ निर्माण झाली, तिच्यामुळें पांढरपेशावर्गांत नवजागृति उत्पन्न झाली होती. स्वराज्याच्या राजकारणाभोंवतीं पावित्र्याचें आणि धार्मिकतेचें तेजोवलय तयार होऊं लागलें होतें. राष्ट्रीयत्वाची व भारतीय संस्कृतीची भावना एकरूप होऊं लागली होती. या धार्मिकतेनें उजळलेल्या राष्ट्रीयत्वाचें स्पन्दन व स्फुरण जुन्या परंपरेंत वाढलेल्या शास्त्रीपंडितवर्गास मात्र स्पर्श करूं शकलें नाहीं. त्यांत जे कांहीं अपवाद देशांत उत्पन्न झाले, त्यांत प्राज्ञमठ व त्याचे आचार्य यांची गणना करतां येते. धार्मिक पावित्र्य आणि राष्ट्रीयत्व यांचा उचित संगम होऊन राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ निर्माण झाली."..."राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळींत प्राज्ञपाठशाळेला महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें... अंगमेहनतीचे उद्योग करणारे, राष्ट्रभक्तीनें भरलेले धर्मशिक्षक व धर्मप्रचारक निर्माण करणें ही कल्पना अजून कोणासहि एक भव्य व उदात्त शैक्षणिक ध्येयाचें स्वप्न वाटेल. हें स्वप्न खरें करण्याकरितां गुरुवर्यांनीं आणि त्यांच्या सहकाऱ्यांनीं आयुष्यांतील ऐन उमेदीचीं वर्षें घालविलीं. "..." धार्मिक व सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंतांचें केंन्द्र म्हणून प्राज्ञपाठशाळा ही संस्था गुरुवर्यांच्या मार्गदर्शनाखालीं काम करीत आहे. "

" विनामूल्य विद्याप्रदान निरंतर जन्मभर करणारा आणि परोपजीवी व मिंधा न झालेला, केवळ देहधारणेपुरताच प्रतिग्रह करणारा, उद्यांकरितां देखील कसलाहि संग्रह न करणारा आचार्यवर्ग या देशांत होता असें जर म्हटलें, तर त्यास चिकित्सक कल्पित कथेंत घालतील. परंतु असे आचार्य या देशाला यापुढें मिळालेच पाहिजेत. जर मिळाले नाहींत, तर सत्याचा शुद्ध बुद्धीनें शोध करणारा माणूस उत्पन्न होणार नाहीं. असा माणूस उत्पन्न करणें हें शिक्षणाचें मुख्य ध्येय आहे. प्राचीन आचार्यसंस्थेचें प्रतीक, या नव्या जगांत आकस्मिक रीतीनें जिवंत असलेलें पाहाण्याचें भाग्य मला लाभलें. तें म्हणजे गुरुवर्य श्री केवलानन्दसरस्वती होत. "

स्वामी केवलानन्दांनीं आत्मचरित्रविषयक टिप्पण केलें आहे, तें अप्रकाशित आहे. पण श्री. लक्ष्मणशास्त्र्यांनीं या चरित्रांत मधूनमधून त्यांतील टिपणांचा उपयोग केला आहे. त्यामुळें या चरित्रांतील खुमारींत भरच पडली आहे. पुढील कांहीं उतारे पाहा :

" अध्ययन-अध्यापनामध्यें आपलें सर्व आयुष्य वेंचावयाचें असें वयाच्या २३ व्या वर्षी निश्चित झालें. शारीरिक, मानसिक व बौद्धिक बल पूर्णपणें अनुकूल होतें. संसार करावयाचा नाहीं असें ठरविलें. द्रव्यार्जनावांचून संसार करतांच येत नाहीं आणि द्रव्यार्जन करावयाचें तर तें प्रायः तोंडपुजेपणा, लांगूलचालन, स्वाभिमानशून्यता इत्यादि दुर्गुणांवांचून शक्य दिसत नाहीं असें दिसून आलें. पारतंत्र्य अति दुःसह आहे, त्यामुळें स्वोन्नति करतां येत नाहीं असें वाटूं लागलें. विचार करूं लागलों. कोणाच्याच ताब्यांत जावयाचें नाहीं. भिक्षा मागावी लागेल. पण आजहि भिक्षा मागतोंच आहोंत, तशीच आजन्म मागूं. पण एक भिक्षा म्हणजे मधुकरी सोडल्यास इतर गोष्टींत कोणाच्या ताब्यांत जाण्याचा प्रसंग येऊं द्यावयाचा नाहीं. सुदैवानें पुढें तसेंच घडून आलें. २३ व्या वर्षापासून ५३ व्या वर्षापर्यंत—संन्यस्त होईपर्यंत—अध्यापनाचें कार्य तप म्हणून केलें. मधुकरी, भोजन, थोडी स्नानसंध्या, योगाभ्यास, थोडी झोंप यांखेरीज सर्व काळ अध्ययन-अध्यापनांत गेला. कांहीं काळ सामाजिक, राजकीय चळवळीमध्येंहि गेला."..." फुकटचें








खाऊं नये असें पितृवाक्य आहे. आम्ही जन्माचेच भिक्षेवर निर्वाह करणारे आणि आतां तर सरळच संन्यासी. अर्थात्, मी पण माझ्याजवळ असलेलें विद्याधन देतां येईल तसें द्यावें असें समजतों आणि तें देहपातापर्यंत यावत्-शक्ति चालेल. आतां सद्‌गुरुकृपाप्राप्त अध्यात्माच्या आसनावर स्थिर बसून लेखनव्यवसाय करीत केवलानन्दसरस्वती यावत्-प्रारब्ध राहणार आहे. न्याय, व्याकरण, मीमांसा, वेदान्त इत्यादि शास्त्रार्थोंचें मोठें घबाड जवळ असल्यानें 'आनंदं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कुतश्चन'!!

'भारताचा आर्थिक विकास'

'इंडिअन कौन्सिल ऑफ वर्ल्ड अफेअर्स' या दिल्ली येथील संस्थेतर्फे इंग्रजींतून निघणाऱ्या 'इंडिया क्वार्टर्ली' या त्रैमासिकाच्या एप्रिल-जून (१९५२) अंकांत प्रा. धनंजयराव गाडगीळ यांचा 'भारताचा आर्थिक विकास' या मथळ्याचा लेख आला आहे. मूळ इंग्रजी लेख मोठा असून त्याचा संक्षिप्त सारांश 'रचना' द्वैमासिकाच्या नोव्हेंबरच्या अंकांत आलेला आहे. त्यापेक्षांहि संक्षिप्त गोषवारा 'लोकमान्या'च्या (ता. २८।१०।१९५२) अग्रलेखांत दिला आहे, तो येथें पुढें उद्धृत केला आहे :

प्रा. गाडगीळ यांच्या मतें, भारताच्या पंचवार्षिक योजनेंत पाट-बंधारे व वीजशक्ति यांवर सरकारी पैसा खर्चुन व शेतींत नवीं साधनें वापरून शेतीचें उत्पादन वाढविणें यावर मुख्य भर आहे. वाहतुकीच्या सोयी वाढविण्यावर बराच खर्च योजलेला असून, उद्योगधंद्यांवर खर्च फार कमी आहे. शेतीचें उत्पादन वाढविण्यावर भर बराच असला तरी शेतीच्या पुनर्घटनेची योजना चांगलीशी आंखलेली नाहीं. मोठमोठे धंदे, व्यापार, बँका हें सारें खाजगी मालकींतच राहायचें आहे. शेतींतून अधिक उत्पन्न काढणें आणि उपभोग्य मालाचे जे मोठे कारखाने आज देशांत आहेत, त्यांतून अधिक माल निर्मूण घेणें एवढेंच भारताच्या पंचवार्षिक योजनेचें मुख्य उद्दिष्ट आहे. या पांच वर्षांनंतरहि ज्याचा विकास होत राहिला पाहिजे अशा कोणत्याच गोष्टीचा पाया या योजनेंत घालण्याचें योजिलेलें नाहीं. या पांच वर्षांत उत्पादन वाढण्यापुरता विचार केला तरी, असें दिसतें कीं, जमीनदारी नष्ट करण्याची भूमिका नियोजनकारांना मान्य आहे, पण असंख्य लहान लहान शेतकऱ्यांची उत्पादनवाढीच्या दृष्टीनें संघटना करण्याचा निश्चित आराखडा समितीनें आपणांसमोर ठेवलेला नाहीं. आणि औद्योगिक कारखानदारीच्या मालाचें उत्पादन मागणी-पुरवठा या तत्त्वावर होईल तसें होऊं द्यावें ही विचारसरणी नियोजनसमितीनें स्वीकारलेली दिसते. पण, प्रा. गाडगीळ म्हणतात, केवळ 'अधिक उत्पादन करा' ही घोषणा आर्थिक विकासाला उपयोगी पडत नाहीं. विविध-अंगीं उत्पादनवाढ व्हावी लागते व तीं सर्व अंगें एकत्र जुळवून त्यांचा सणंग विकासक्रम आंखावा लागतो. आधुनिक जगांत शेतींतील उत्पादन वाढविण्यानें पुरेसा विकास होत नाहीं. शेतीपेक्षां उद्योगधंद्यांत प्राप्ति अधिक असते. आणि शेतींत गरजेहून अधिक असणारी लोकसंख्या उद्योगधंद्यांत गुंतविण्यासाठीं नवे व भांडवली धंदे काढावे लागतात. लोकसंख्या इतकी वेगानें वाढत आहे व देश इतका दरिद्री व मागसलेला आहे कीं, नुसत्या अधिक अन्न पिकविण्यानें लोकसंख्यावाढीबरोबर येणारी तूट फक्त आजची उद्यांवर जाईल. भांडवली धंदे वाढल्यावांचून लोकसंख्यावाढीपेक्षां अधिक धनवाढ होणार नाहीं.

देशांतील एकंदर जनतेचें वार्षिक उत्पन्न जवळजवळ ९ सहस्र कोटि आहे, असें राष्ट्रीय उत्पन्नसमितीनें संशोधून ठरविलें आहे. याच्या फक्त पांच ते सहा टक्के भांडवल उत्पादनाच्या कामी यावें अशी योजना नियोजन-समितीनें आंखली आहे. पण प्रा. गाडगीळांच्या मतें हें भांडवल अगदींच तोकडें आहे. शेतींतले लोक उद्योगधंद्यांत आणायचें म्हटलें तर एका नवीन कामगाराला काम देण्यासाठीं सवा लाख रुपये भांडवल उभारावें लागतें. आणखी सत्तर लक्ष लोक शेतींतून काढून पांच वर्षांत कारखानदारींत आणायचे तर पांच वर्षांत ८७५० कोटि रुपयांचें भांडवल उभारावें लागेल. तसेंच शेतींत राष्ट्रीय उत्पादनापैकीं ४ टक्के भांडवल घालायचें तर पांच वर्षांत १८०० कोटि भांडवल








घालावें लागेल; म्हणजे पांच वर्षांत एकूण १० सहस्र ५५० कोटि रु. भांडवल अथवा दरसाल २ सहस्र ११० कोटि रु. भांडवल एकूण उत्पादनांत घालावें लागेल. एकूण राष्ट्रीय उत्पादनाच्या २३·३ टक्के हें भांडवल होतें. जपानांत १९४९ ते १९५३ या सालच्या उत्पादनाचा जो आराखडा आंखलेला आहे त्यांतहि राष्ट्रीय उत्पन्नाच्या २३ टक्क्याहून अधिक भाग भांडवल म्हणून वापरण्याचें योजिलेलें आहे. जपान हें उत्पादनकर्तृत्वांत पुढारलेलें राष्ट्र असूनहि त्याला एवढ्या प्रचंड भांडवलाची गरज आहे. अर्थात् भारतासारख्या मागसलेल्या राष्ट्रास पुढारलेल्या राष्ट्रांच्या बरोबर जायचें तर कमी भांडवलानें प्रगति होणार नाहीं. राष्ट्रीय उत्पन्नाच्या २३ टक्के भांडवलाची गरज असतां अवघें ५ टक्के भांडवल नियोजन-समितीनें घालण्याचें ठरविलें आहे. लोकसंख्या तर अफाट वाढते आहे! अशा स्थितींत पंचवार्षिक योजना संपूर्ण यशस्वी झाली तरी पांच वर्षांच्या शेवटीं आमचें दारिद्र्य व मागसलेपण जेथल्या तेथेंच राहणार आहे. यांतहि परदेशी मदतीवर आपली बरीच भिस्त आहे. परकी मदत मिळाली तर ती घेऊं नये असें प्रा. गाडगीळांना म्हणायचें नाहीं. पण भारताचें आर्थिक परावलंबन लवकर नष्ट व्हावें अशी उत्पादनसंघटना उभारण्याचें स्वातंत्र्य कायम ठेवून ही मदत मिळणें कठिण आहे. अशी मदत मिळाली तरी ती दरसाल शंभर ते दोनशें कोटींपर्यंत मिळेल. पण दरसाल दोन सहस्र कोटींच्या भांडवलाची जेथें गरज आहे, तेथें शंभर ते दोनशें कोटींसाठीं परक्यावर विसंबण्याचा उपयोग काय?

हें इतकें भांडवल कोठून उभारायचें? यासाठीं प्रा. गाडगीळ यांनीं दोन मार्ग सुचविले आहेत. दीर्घकाल स्वार्थत्यागाचें तत्त्व अवलंबून उपभोग्य माल कमी निर्मायचा व अधिकाधिक धन भांडवलांत रूपांतरित करून योजना-व-नियंत्रणपूर्वक नवीन उत्पादन वाढवीत न्यायचें हा पहिला मार्ग. पण त्यासाठीं प्राथमिक धनसंचय तरी प्रथम व सालोसाल कोठून आणावयाचा? शेतकरी व कामकरी हे दरिद्री आहेत. त्यांच्यापासून धनसंचयाची अपेक्षा व्यर्थ आहे. उद्योगधंदे, विमा, बँका, विदेशी व देशी घाउक व्यापार हीं धनसंचयाचीं क्षेत्रें होत. हे व्यवसाय अगदीं थोड्या लोकांच्या हातीं असल्यानें या क्षेत्रांत होणारा धनसंचय या लोकांच्याच हातीं राहतो. हा सर्व धनसंचय सरकारच्या नियंत्रणांत येण्यासाठीं हीं सर्व क्षेत्रें संपूर्णपणें सरकारच्या मालकींत आणणें म्हणजे या सर्व व्यवसायांचें राष्ट्रीयीकरण करणें हाच येथें मार्ग आहे. केवळ धनसंचय सरकारच्या हातीं यावा एवढ्याचसाठीं या व्यवसायांचें राष्ट्रीयीकरण अवश्य आहे असें नव्हे; तर यापुढें थोडें अथवा पुष्कळ भांडवल जें गुंतवलें जाईल तें सरकारी नियंत्रणानें व आदेशाप्रमाणेंच गुंतविलें जाणें अवश्य आहे. तरच त्याला आर्थिक नियोजन म्हणतां येईल व त्यासाठींहि या व्यवसायक्षेत्रांचें राष्ट्रीयीकरण अवश्य आहे. तसेंच, वाढलेल्या उत्पादनाचें लोणी मूठभर लोकांच्या पोटांत गडप होऊं नये, यासाठींहि या व्यवसायक्षेत्रांचें राष्ट्रीयीकरण अवश्य आहे.

## भूदान-यज्ञ आणि साहित्यिक

बनारसमध्यें ता. ३१।८।५२ रोजीं राष्ट्रकवि-परिषदेंत मानपत्रसमारंभ झाल्यावर श्री विनोबांनीं जें प्रवचन दिलें तें सर्वच साहित्यिकांना महत्त्वाचें वाटावें असें होतें. कै. महादेवभाईंचे चिरंजीव श्री. नारायण देसाई यांनीं त्याचा सारांश ‘ संस्कृति ’ मासिकांत ( ऑक्टोबर १९५२ ) दिला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

“ वाचा व अर्थ यांची तुलना कालिदासानें पार्वती-परमेश्वरांबरोबर केली आहे. ‘ अर्थ ’ म्हणजे जीवन आणि वाक् म्हणजे साहित्य. हीं दोन्ही एकमेकांवांचून राहूं शकत नाहींत. वाचेच्या योगें जीवनाची प्रभा पसरते. या दोहोंचा संबंध सूर्य व किरण यांच्यासारखा आहे. दोन्ही खरोखर अभिन्न आहेत. पण प्रचारकाचें काम मात्र किरणच करतात. जीवनाच्या प्रभेच्या रूपानें साहित्य प्रकट होतें.... कित्येक वेळां साहित्य व सत्य एकत्र पाहावयास मिळतात. उदा. व्यास. ते शब्दनिष्णात होते, तसेच व्यवहारवेत्तेहि होते. दुसरें उदाहरण शंकराचार्यांचें... एकाच व्यक्तींत हे दोन्ही गुण एकत्र असणें हा ईश्वरप्रसादच होय. दोहोंपैकीं एकच गुण असलेले लोक अधिक असतात. ते जर एकमेकांना पोषक








झाले तर फार मोठी गोष्ट होईल....माणूस तपस्वी नसेल, चिन्तनशील नसेल, तर त्याच्या हृदयांत महान् शब्द स्फुरत नाहींत. ऋषी मोठे कर्मयोगी नसले तर नसोत, पण ते जर जीवननिष्ठ असले तर त्यांचे शब्द प्रेरणा देतील. केव्हां केव्हां सामान्य लोकांनाहि महान् शब्द स्फुरतात. पण त्यांच्या हृदयांत ते फार वेळ टिकत नाहींत. ऋषिमुखांतून स्फुरलेल्या शब्दांची गंगोत्री बनते, तिच्यांतुन गंगा उत्पन्न होते. सामान्य लोकांच्या शब्दांचा झरा हा केवळ झराच राहतो.

" सौहार्द शोधतां शोधतां मला भूदानयज्ञाचें शस्त्र गवसलें, व तें चांगलें चालत आहे. परमेश्वराच्या कृपेनें मला ( भूदान ) शब्दच असा सांपडला आहे कीं, ज्यामुळें अनेकांना समान भूमिकेवर आणलें आहे. त्यामुळें शांतिवादी व क्रांतिवादी असे दोन्ही प्रकारचे लोक एकत्र येऊं लागले आहेत. जेथें काळी कालिंदी आणि गौर गंगा एकत्रित होतात तेथेंच प्रयाग बनतें. भूदान-यज्ञहि प्रयागाप्रमाणेंच संगमरूप कार्यक्रम झाला आहे. त्यांत प्राचीन संस्कृति व अर्वाचीन संस्कृति यांचाहि संगम आहे.

" हिंदी साहित्य संमेलनाला मीं असा निरोप दिला होता कीं, मला तुम्ही वाग्दान द्या. तीच मागणी मी तुमच्याकडेहि करीत आहे... कित्येक लोक सूर्योदयामुळें जागे होतात. कित्येक पक्ष्यांच्या गीतामुळें जागे होतात. पक्ष्याप्रमाणेंच लोकांना जागृत करावयाची शक्ति वाणींत, साहित्यांत, सारस्वतांत आहे. या शक्तीचा उपयोग तुम्ही या कामाकरितां करावा असें मी इच्छितों. वाग्वीरां-जवळ मी वाग्दानाची मागणी करतों. "

## सिलोनमधील हिंदी लोकांचा प्रश्न

सिलोनमधील हिंदी लोकांच्या नागरिकत्वाचा प्रश्न आज अनेक वर्षें घोळत पडला आहे. सिलोनचे भूतपूर्व पंतप्रधान व हिंदुस्थानचे पंतप्रधान यांच्या-मध्यें जो ठराव झाला होता त्याप्रमाणें तेथें राहणाऱ्या हिंदी माणसाच्या बायका-मुलांना तेथील नागरिकत्वाचे हक्क, तीं तेथें सर्वसाधारणपणें—Ordinary residence—राहत असतील, तर त्या कुटुंबमुख्याबरोबरच मिळावयाचा होता. परंतु नवीन सिलोनी पंतप्रधानांनीं नव्या निवडणुका लढवतांना Ordinary शब्दाचा अर्थ Continuous म्हणजे ' सतत ', ' खंड न पडतां ' असा केला व निवडणुकी जिंकल्या. मध्यंतरीं प्रीव्ही कौन्सिलनें आपला निर्णय दोघां हिंदी माणसांच्या केसमध्यें स्पष्टपणें देऊन Normal किंवा Ordinary याचा अर्थ ' खंड न पडतां, सतत ' असा करतां येत नाहीं असें जाहीर केलें. तेव्हां आतां सिलोनी लोकसभेंत बिल मांडून Ordinary चा अर्थ Continuous होतो असा कायदा नवे सिलोनी पंतप्रधान करूं पाहात आहेत. त्याबाबत एक सिलोनी हिंदी लोकांचें शिष्टमंडळ नेहरूंना भेटलें असून नेहरूंनीं त्याला असें स्वच्छ बजावलें आहे कीं, Ordinary चा अर्थ असा मूळ तडजोडींत अभिप्रेत नव्हता आणि सिलोनी सरकारनें असा अर्थ धरून कायद्यांत सुधारणा करणें म्हणजे कराराचा भंग करणें होय; तसें त्यांनीं करूं नये. परंतु सिलोनी सरकार दक्षिण आफ्रिकन सरकारचाच दंडेलीचा मार्ग चोखाळणार असें दिसत आहे. ही सर्व भानगड पूर्णपणें लक्षांत येण्यास त्यामागची भूमिका लक्षांत घेणें इष्ट आहे. व्ही. सुब्रह्मण्यम् यांनीं ' फ्री प्रेस जर्नल 'च्या ८ नोव्हेंबरच्या अंकांत एक लेख लिहून ही माहिती दिली आहे. त्याचा सारांश पुढें दिला आहे :

" मूळ हिंदी असलेल्या सिलोनमधील हिंदी रहिवाश्यांना नागरिकत्वासाठीं लागू असणारा कायदा ' सिलोन इंडियन-पाकिस्तानी रेसिडन्ट्स् सिटिझन-शिप ॲक्ट ' नांवाचा आहे. हा कायदा १९४८ सालीं पसार होत असतांनाच सिलोनी हिंदी काँग्रेसच्या सभासदांनीं व इतर सर्व डाव्या गटांनीं असें स्पष्ट निदर्शनास आणलें कीं, या कायद्याच्या कित्येक कलमांमुळें जवळजवळ नागरिकत्व नाकारल्यासारखेंच होत आहे. तरी हा कायदा पास करण्यांत आला. तेव्हां या कायद्याखालीं सिलोन-मधील हिंदी रहिवाश्यांनीं नागरिकत्वासाठीं नोंदणी करूं नये असा ठराव सिलोन इन्डियन काँग्रेसनें केला. एक वर्षभर हा बहिष्कार यशस्वीपणें चालला, फक्त कोलंबोमधील कांहीं व्यापाऱ्यांनींच तेवढीं आपलीं नांवें नोंदविलीं. सरकारतर्फे अशी सूचना

करण्यांत आली कीं, सिलोनी हिंदी लोकांनीं कायद्याची अंमलबजावणी करण्यांत सहकार्य करावें व मग त्यांत जे कांहीं दोष आढळून येतील ते निदर्शनास आणावे. सि. इं. कॉंग्रेसनें असहकाराचा आरोप टाळण्यासाठीं सिलोनी सरकारशीं सहकार्य करावयाचें ठरविलें ( १९५० ), व नियमाप्रमाणें ज्यांना नोंदणी करून घेतां येत होती अशा सर्व हिंदी रहिवाश्यांचे नोंदणी-अर्ज मुक्रर तारखेच्या पूर्वींच सादर करण्यांत आले; परंतु अनेक कारणां-मुळें सिलोनी सरकारच्या आंत एक बाहेर एक अशा धोरणामुळें हिंदी रहिवाश्यांचें मत कटु झालें. एक तर सिलोनमधील हिंदी हायकमिशनरच्या खात्यांतील लोक मोठमोठ्या मळ्यांतील मजुरांना नोंदणी अर्जाबाबत मदत करीत होते हें सिलोनी सरकारला सहन झालें नाहीं. दुसरें म्हणजे सिलोनी पंतप्रधानानें कायद्यांतील उणीव दूर करण्याबाबतच्या न्याय्य मागण्याहि धुडकावून लावल्या व हिंदी रहिवाश्यांच्या शिष्टमंडळाला याबाबत स्पष्ट नकार कळविला. मात्र, सिलोनमध्यें जन्मलेल्या हिंदी रहि-वाश्यांच्या बाबतींतील एक सुधारणा मात्र कायद्यांत करण्यांत आली. परंतु बाकी कलमें तशींच राहिलीं. हिंदी कुटुंबमुख्यानें आपल्या बायकामुलांचा Normal रहिवास ७ वर्षे सिलोनमध्यें होता हें सिद्ध करावयाचें होतें आणि रजिस्ट्रेशनचा मुख्य अधिकारी Normal चा अर्थ ' अखंडपणें सतत ' absolutely continuous असा करूं लागला.

" तिसरी बाब फारच चमत्कारिक आहे. या कायद्याप्रमाणें हिंदी माणसानें असें दाखवावें लागतें कीं, त्याला सरकारी मदतीशिवायचें स्वतंत्र निर्वाहाचें साधन आहे ! नोकऱ्यांतील जागांचें सिलोनीकरण करण्याच्या सरकारी धोरणांमुळें हिंदी मालकांनाहि हिंदी लोकांना नोकऱ्या देण्याच्या बाबतींत अडचण येऊं लागली ! म्हणजे एखाद्याला स्वतंत्र धंदा नसेल, तर त्याला सिलोनी नागरिक होतां येणार नाहीं, आणि सिलोनी नागरिक असल्यावांचून नोकरीधंदा मिळणार नाहीं ! अशी विचित्र स्थिति उत्पन्न झाली. तसेंच अर्ज करतांना जीं मुलें वयांत आलेलीं नव्हतीं म्हणून त्यांचा उल्लेख मुख्य माणसाच्या अर्जांतच केला होता. तीं अर्जांचा निकाल होईपर्यंत वयांत आलीं तरी त्यांचीं नांवें रद्द होऊं लागलीं ! कारण वयांत आलेल्यांनीं कायद्याप्रमाणें वेगळे अर्ज करावयाचे असतात ! अर्जदार अर्ज केल्यावर जर वारला तर त्याचा अर्ज इतर बायकामुलांच्या नांवासह सरळ नामंजूर समजला जात असे, म्हणजे त्याच्याबरोबरच त्यावर अवलंबून असलेल्या सर्व माणसांना नागरिकत्वाला मुकावें लागे. अशा तऱ्हेच्या सर्व उणीवा सिलोन हिंदी कॉंग्रेसनें सरकारच्या दृष्टोत्पत्तीस आणल्या, पण त्याचा अजूनहि कांहीं उपयोग झालेला नाहीं.

" अर्जदारानें कागदोपत्रीं दाखल करावयाचा पुरावा फारच कडक स्वरूपाचा होता. तोहि हजर करण्याची हिंदी लोकांची तयारी होती. परंतु सरकारी अधिकारी कोणते कागदपत्र पाहिजेत याबाबत निश्चित कल्पना देईनात. अशा प्रकारें कायदा तर त्रासदायक होताच, पण सरकारी अधिकाऱ्यांची वृत्ति त्रासदायक ठरत होती.

" अशा प्रकारें अडचणी येऊन कित्येक अर्ज फेटाळले गेले, तर कित्येकांचा निकाल लागावयाचा राहिला. तेवढ्यांत १ महिन्यांपूर्वीं सरकारनें अखेरचा कायदा पास करून घेण्याचा निर्धार केला आणि ज्या अर्जांचा निकाल अजून लागलेला नव्हता त्या सर्वांना मतदारांच्या यादींतून काढून टाकलें ! सरकारनें ' लंडन टाइम्स 'कडून असें वदविलें कीं हिंदी लोकांनीं आपणहून मतें दिलीं नाहींत—" The Indians did not 'choose ' to vote ! " हा कायदा ' सिलोन इलेक्शन अमेन्डमेन्ट ॲक्ट ' होय.

"अशा प्रकारें ८ लाख लोकांना नागरिकत्वाच्या व मतदानाच्या हक्काला मुकावें लागण्याची परि-स्थिति आज उभी राहिली आहे. त्यामुळें सिलोन हिंदी कॉंग्रेसनें सत्याग्रह करावयाचा निर्णय घेतला. या सत्याग्रहाला मुख्य बाबतींत यश आलें असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्यामुळें मतदारांच्या यादीं-तून कमी झालेलीं नांवें पुन्हां घातलीं गेलीं नाहीं-तच, पण त्या सत्याग्रहामुळें सिलोनी जनता व सरकार यांना या अन्यायाबाबत विचार करावा लागला. कांहीं सवलती देण्याचें बोललें जात आहे








अर्जाचा निकाल करावयाला लागणारा नोकरवर्ग वाढवावयाचा तो अजून उपलब्ध होत नाहीं.

" अर्ध्याहून अधिक अर्ज फेटाळले गेले असल्यामुळें त्यांना नुकत्याच जाहीर झालेल्या प्रीव्ही कौन्सिलच्या निकालाचा फायदा मिळणार नाहीं ! त्या प्रत्येकाला स्वतंत्र दावा करावा लागेल ! हें जवळजवळ अशक्य आहे. तसेंच सरकारनें निम्म्याच्या योजनेची अंमलबजावणी करतांनाहि अशी हिकमत लढविली आहे कीं, कित्येक हिंदी मजूर कुटुंबांना परत हिंदुस्थानांत परतावें लागावें ! मुख्य अर्जदाराला म्हातारपणाच्या सबबीखालीं कामावरून दूर करावयाचें म्हणजे तो व त्याचें कुटुंब बेकार बनतें आणि त्यांना आपोआपच सिलोनी नागरिकत्वाला मुकावें लागतें. "

## हिंदुस्थानांतील कम्युनिझमचें भवितव्य

सुप्रसिद्ध विचारवंत श्री. मानवेन्द्रनाथ रॉय यांचा ' हिंदुस्थानांतील कम्युनिझमचें भवितव्य ' नांवाचा एक लेख कांहीं दिवसांपूर्वी (' इलस्ट्रेटेड वीक्ली ' १७-८-५२ ) प्रसिद्ध झाला होता. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

" कम्युनिस्ट पार्टीला गेल्या सार्वत्रिक निवडणुकींत अनपेक्षित यश मिळालें. परंतु भारतांतील कांहीं राज्यांत तरी घटनात्मक पेंचप्रसंग किंवा सावळागोंधळ उत्पन्न करण्याचें त्यांना अजून जमलें नाहीं. कांहीं काँग्रेस नेत्यांचा प्रभाव आणि कांहीं गटांचा संधिसाधूपणा यांमुळें कायदेमंडळांतहि कम्युनिस्टांना प्रभाव पाडतां आलेला नाहीं. तसेंच मध्यवर्ती लोकसभेंत सर्वांत मोठा विरोधी गट म्हणूनहि त्याला विशेषसें परिणामकारक कार्य करतां आलेलें नाहीं.

" तरी पण हिंदी कम्युनिस्ट पक्ष म्हणजे हिंदी राजकीय वातावरणांतील बागुलबोवा निश्चित ठरला आहे. दक्षिण-पूर्व आशियांत हिंदुस्थान हाच एक स्थिर वातावरणाचा देश असल्यामुळें तेथें इतर देशांप्रमाणें कम्युनिस्टांना तेवढें महत्त्वाचें स्थान काबीज करतां आलें नाहीं. कारण, येथें तेथल्याप्रमाणें जपानी आक्रमणानें भयानक अंदाधुंदी माजवलेली नव्हती. ब्रिटिशांपासून मिळविलेल्या राजकीय स्थिरतेमुळें कम्युनिस्टांचें कांहीं चालूं शकलें नाहीं. पण आतां ती परिस्थिति बदललेली आहे. निवडणुकीनंतर तो स्थिरतेचा लहानसा कालखंड संपला आणि नव्या प्रगतिकारक अस्थिरतेला प्रारंभ झाला आहे. तिचा फायदा कम्युनिस्टांना निश्चित घेतां येईल. हिंदी कम्युनिस्ट पक्षाची उपेक्षा करून चालणार नाहीं. काँग्रेस वगळली तर या पक्षाइतकी परिणामकारक संघटना दुसऱ्या कोणाचीहि नाहीं आणि त्यांना कायदेशीर व कायदाबाह्य कार्यक्रम संयुक्तपणें चालवितां येईल.

" कम्युनिस्ट पक्षाची सभासद-संख्या १५ हजार ते ५० हजार पर्यंतच असावी. परंतु त्यांचें सामर्थ्य संख्येवर अवलंबून नसून सभासदांच्या चिवट फौजी वृत्तीवर अवलंबून आहे ( It is a cadre party ). त्या संघटनेला प्राप्त झालेली ( प्रत्यक्षपणें किंवा इतर उपसंस्थांच्याद्वारें अप्रत्यक्षपणें ) जनतेची उठावणी करण्याची शक्ति हाच खरा निर्णायक भाग आहे. जहाल डाव्या पक्षाचें हें सर्वसामान्य मत आहे कीं, हिंदुस्थानला राजकीय स्वातंत्र्य मिळालें तरी त्याचें अर्थकारण अजूनहि साम्राज्यशाहीच्या हातींच आहे. त्यामुळें पूर्वीच्या साम्राज्यविरोधी भावनेला आतां चतुर प्रचारानें वेगळें वळण देऊन ती साम्यवादी पक्षाला पोषक बनवितां येणें अगदीं शक्य आहे.

" राजकीय स्वातंत्र्यानें आर्थिक स्थिति सुधारली नाहीं. साधारण स्थिर मिळकत असलेल्या मध्यमवर्गाला फारच त्रास सहन करावा लागत आहे. कदाचित् एवढ्या थोड्या काळांत यापेक्षां विशेष कांहीं करतां येणें शक्यहि नसेल. पण राष्ट्रवादी पक्षाच्या प्रचारानें असा भ्रम निर्माण केला होता कीं, संत पुरुषाचे हे अनुयायी सत्ताधारी होतांच चमत्कार करून दाखविणार आहेत. पण अनुभवानें भ्रमनिरास झाला आहे आणि अंधश्रद्धेचा अंमल कमी होऊं लागला आहे. या परिस्थितीचा कम्युनिस्ट पक्षाला राजकीय दृष्ट्या चांगलाच फायदा घेतां येत आहे. कम्युनिस्टांनींहि वचनें दिलीं आहेतच. पण त्यांच्या वचनामागें चिनी क्रांतीचें उदाहरण आहे आणि रशियाचें सामर्थ्य आहे.

" कम्युनिस्ट संघटनेच्या आडोशाला असलेल्या अनेक संस्थांची मदत त्या पक्षाला सहज मिळवितां







येते. फ्रेन्डस् ऑफ दि सोवियेत युनियन, दि इन्डो-चायनीज़ कल्चरल लीग, दि इन्टरनॅशनल पीस कमिटी आणि प्रोग्रेसिव्ह राइटर्स असोसिएशन् या अशा संस्था आहेत. त्या पक्षाला कोणत्याहि वेळीं अनेक नामवंत प्राध्यापक, शास्त्रज्ञ, डॉक्टर, लेखक, वृत्तपंडित यांना चीन-रशियाला जाणाऱ्या प्रतिनिधि-मंडळांत सामील करून घेतां येतें. तसेंच अनेक उच्चपदस्थ व्यक्तींची छुपी मदत व सहानुभूति त्या पक्षाला मिळत असते.

"कम्युनिस्ट पक्षाचा मोठा कमकुवतपणा म्हणजे कोणत्याहि प्रकारच्या निश्चित धोरणाचा अभाव हा होय; व असें होण्याचें कारण म्हणजे रशियाचा डोळा हिंदी परराष्ट्रीय धोरणाकडे नेहमीं सूक्ष्मपणें लागलेला असतो हें होय. जेव्हां हिंदुस्थाननें लाल चीनचा पुरस्कार केला आणि अनेक वेळां यूनोमध्यें साम्यवाद्यांप्रमाणें मत दिलें किंवा मत देण्याचेंच नाकारलें तेव्हां हिंदी कम्युनिस्टांना नेहरू सरकारला पाठिंबा देण्याचा आदेश मिळालेला होता. फ्रेंच, इटालियन साम्यवाद्यांप्रमाणें हिंदी साम्यवादीहि घटनात्मक पद्धतीनें महत्त्वाच्या जागा काबीज करतील असें त्या वेळीं वाटूं लागलें होतें. १९४८ सालच्या मेळाव्यांतील मोडतोडीच्या व भूमिगत राजकारणाच्या आदेशाचा ठराव हा केवळ बी. टी. रणदिवे यांचा साहसी प्रयोग मानला जाऊं लागला होता. भूमिगत पॉलिट-ब्यूरोनें अत्याचाराचा निषेध करणारा व कायदेशीर सार्वत्रिक उठावणीचा अवलंब करण्याचें वचन देणारा फतवा बाहेर पाडला. मग कांहीं पुढारी परिस्थिति अजमावण्याला बाहेर आले आणि श्री. डांग्यांनीं तर वृत्तपत्रप्रतिनिधींना मुलाखत देऊन कम्युनिस्ट पक्षावरचा अत्याचारी प्रवृत्तींचा आरोप खोटा आहे असें जाहीर केलें !

"परंतु सरकारचा या परिवर्तनाच्या भाषेवर विश्वास बसला नाहीं आणि कम्युनिस्ट पक्षानें तक्रार सुरू केली कीं, आम्ही गोडीगुलाबीनें वागूं म्हणतों तरीहि दुष्ट सरकार अडथळे आणीत आहे. खरी स्थिति अशी होती कीं, पक्षाचें धोरण अनिश्चितपणें व अनेक मुखांनीं व्यक्त होत होतें. कांहीं वेळ तर मध्यवर्ती नेतृत्वच अस्तित्वांत नव्हतें ! पक्षाच्या प्रधानमंत्र्याची जागा रिकामीच होती ! सर्वशक्तिमान् पॉलिटब्यूरोचें कोण्या अदृश्य शक्तीच्या इशाऱ्यामुळें विसर्जन करण्यांत आलें ! तेवढ्यांत हिंदुस्थानच्या सरहद्दीवर साम्यवादी दडपण वाढूं लागलें. तिबेटांत लाल चीनचें अधिराज्य आलें, नेपाळांत साम्यवाद्यांचा चंचुप्रवेश होऊं लागला, हिंदी-ब्रह्मी सरहद्दीवरून भयसूचक बातम्या येऊं लागल्या आणि रशियानें सिंकियांग-मधून घुसून काश्मीरशीं आपली हद्द भिडविली. अशा वेळीं हिंदुस्थानांतील व्यापारी हितसंबंधाच्या दडपणाचा जोर होऊन, परराष्ट्रीय धोरणांत बदल होण्याचा संभव दिसतांच आंतून विरोधी दडपण आणण्यास कम्युनिस्ट पक्षानें सुरुवात केली. निवडणुकीच्या आधीं हा बदल घडून आला. निवडणुकीच्या साम्यवादी जाहीरनाम्यांत नेहरू सरकारला उलथवून टाकण्यासाठीं समग्र लोकशक्तींना एकवटण्याचा आदेश देण्यांत आला व 'जनतेची लोकशाही' स्थापन करण्याची घोषणा झाली. अर्थात् यांत रशियाचा आवाज होता.

"कम्युनिस्टांचें निवडणुकींतील प्रारंभीचें यश पुढें प्रभावी ठरलें नाहीं. मद्रास व त्रावणकोर या राज्यांत कम्युनिस्टांच्या प्रभावाखालीं संयुक्त मंत्रिमंडळें स्थापून त्या राज्यांचा मध्यवर्ती सरकारशीं मुकाबला करायला बालेकिल्ल्यासारखा उपयोग करावयाचा, या साम्यवादी धोरणाला यश येणें शक्य नव्हतें. तेव्हां यापुढें कम्युनिस्ट या प्रकारच्या प्रकट प्रतिकाराचा मार्ग सोडून कायदेशीर विरोधी पक्षाची भूमिका घेईल असें मानतां येईल. तरीहि त्यांना या प्रकारें स्वस्थ बसून चालणार नाहीं. त्यांना सत्ता काबीज करण्याचें राजकारण चालूं ठेवावें लागणारच. चीनप्रमाणें एखादा 'येनान' प्रांत त्यांना सध्यां संघटित करतां येवो न येवो, पण सर्व परिस्थिति अशीच घसरत चालली तर एखाद्या प्रांतांत ते सत्ता हातीं घेऊन लष्करी उठाव करतीलहि आणि येनानपेक्षांहि मोठ्या क्षेत्रांत भक्कम पाय रोवून बसतील. यासाठीं त्यांचा जनतेच्या उठावणीचा प्रयत्न चालेल, निरनिराळ्या खात्यांत व लष्करांत आपले लोक घुसविण्याचा प्रयत्न चालेल व







यासाठीं लागणारें साहाय्य मध्यमवर्गाकडून त्यांना मिळेल. आर्थिक स्थिति सुधारतां येवो न येवो, पण राजकीय सत्तेचा लाभ हें आकर्षण निश्चित मोठें आहे व त्याचा पगडा सुशिक्षित मध्यम वर्गावर व आम जनतेवर निश्चित बसेल. ''

" कम्युनिस्टांच्या या प्रभावाच्या मागें केवळ एक सामाजिक ध्येयवादच नाहीं, त्यामागें चिनी-रशियन गटाचें सामर्थ्य आहे. रशियाच्या पर. राष्ट्रीय धोरणाप्रमाणें हिंदी कम्युनिस्ट पक्षाचें धोरण राहील. रशियाचें हिंदुस्थानविषयक धोरण हिंदी-अमेरिकन हितसंबंधावर अवलंबून राहील. आज दिसत आहे कीं, हिंदुस्थान आर्थिक दृष्ट्या अमेरिकेच्या आहारीं अधिकाधिक जात आहे आणि कोणत्याहि देशाचें परराष्ट्रीय धोरण अंतर्गत धोरणाचीच पडछाया असल्यामुळें, हिंदी परराष्ट्रीय धोरण यापुढें कांहींसें बदलण्याचा संभव आहे. तसें झाल्यास हिंदी कम्युनिस्ट पक्षाला प्रभावी प्रचाराला साधन मिळून तो आपलें मूळ निश्चित रोंवून बसेल... .. ''

**मध्ययुगीन महा-पंडितांची सहस्राब्दी**

समरकंद व बुखारा या प्रसिद्ध शहरांपैकीं बुखाऱ्याजवळ सुमारें एक हजार वर्षांपूर्वी ताजिक जनतेचा सर्वश्रेष्ठ मध्ययुगीन पंडित जन्माला आला. त्याचें नांव **' अबु अली इब्न सिना '** (**' आविशेन्ना '** Avicenna हा त्याचा युरोपियन अपभ्रंश.) आजच्या घटकेला बुखारा जरी इराकमध्यें असलें तरी ताजिक जनतेचें नवीन ताजिक सोवियेत राष्ट्र सोवियेत-संघाला जोडलें गेलें आहे. कांहीं महिन्यांपूर्वी ताजिक राष्ट्रानें व जगांतील प्रमुख प्रगतिवादी लोकांनीं या मध्ययुगीन पंडिताची सहस्राब्दी साजरी केली. त्यानिमित्तानें 'सोवियेत युनियन' मासिकानें आपल्या ऑगस्टच्या अंकांत 'एक महान् मानवतावादी' नांवाचा छोटा लेख लिहिला आहे. त्यांतून पुढील माहिती घेतली.

" १० व्या व ११ व्या शतकांत मध्य आशियांतील लोकांच्या अत्यंत पुढारलेल्या संस्कृतीचें ग्रहण करून सर्वश्रेष्ठ पंडित म्हणून अबु अली इब्न सिना यांचें नांव अमर झालें. त्यांनीं तत्त्वज्ञान, खगोलविद्या, रसायन, गणित, भूस्तरविद्या, प्राणिविद्या आणि इतर अनेक विद्या यांविषयीं शंभराहून अधिक ग्रंथ लिहिले आहेत.

" परंतु अबु इब्न सिनाची खरी श्रेष्ठता औषधिविज्ञान व तत्त्वज्ञान या क्षेत्रांत आढळून येते. तत्कालीन वैद्यकीय जगांत याचा मान ' वैद्यांचा राजा ' ( Prince of physicians ) म्हणून होता. त्याचा औषधिविषयक ग्रंथ ' औषधिविज्ञान ' ( ' Canon of Medicine ' ) हाच अनेक पिढ्यांना औषधिज्ञान पुरवीत होता. व तो ग्रंथच विद्यापीठांतील पाठ्यग्रंथ होता. असें ७ शतकें चालूं होतें. मुद्रणाच्या शोधानंतर या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या लॅटिन भाषेंत निघाल्या. त्याचें भाषांतर अरबी व हिब्रू यांसारख्या भाषांतहि झालें. आजतागायत या ग्रंथांतील सूक्ष्म निरीक्षण आणि गाढपणा पाहून आपणांला आश्चर्य वाटतें.

" या पंडिताचा जन्म बुखाऱ्याजवळील अफशाना गांवीं झाला. तो तरुण वयांतच मोठा विद्वान् आणि सार्वजनिक पुरुष म्हणून प्रसिद्धीस आला. त्याचीं मतें बुद्धिनिष्ठ असल्यामुळें प्रतिगामी लोकांनीं त्याचा खूप छळ केला व त्याला किल्ल्यांत डांबून ठेवलें. परंतु तेथेंहि त्यानें आपलें शास्त्रीय संशोधन चालूं ठेवलें. आपल्या मृत्यूपर्यंत तो जगांतील एक श्रेष्ठ शास्त्रवेत्ता व लेखक म्हणून सन्मानिला गेला.

" अबु अलीनें विद्याविरोधी प्रवृत्ति ( obscurantism ) आणि गूढविद्या यांविरुद्ध युद्ध पुकारलें होतें. जादूटोणा, फलज्योतिष आणि किमया यांवर त्यानें, बौद्धिक सिद्धान्त आणि प्रत्यक्ष व निश्चित ज्ञान यांच्या मदतीनें, हल्ले चढविले. आपल्या धातुविषयक ग्रंथांत त्यानें पर्वतावरील थरांतील रचनेबद्दल अनेक महत्त्वाच्या गोष्टी नमूद करून ठेवलेल्या आहेत.

" त्याचा तत्त्वज्ञानविषयक महत्त्वाचा ज्ञानकोशरूप ग्रंथ ' The Book of Recovery ' हा होय. त्याच्या अनेक ग्रंथांचें संशोधन अजून व्हावयाचें असलें तरी जें ज्ञात झालें आहे त्यामुळेंहि मानवजात त्याची अक्षय ऋणी राहील. मग त्याच्या राष्ट्राला व सोवियेत संघाला त्याच्याबद्दल अभिमान वाटावा यांत नवल तें काय ? ''

Regd. No. B. 5177



अनुक्रमणिका